# जिवाशिवाची भेट

## एक खेडवळ नाटक

लेखक

भार्गवराम विठ्ठल वरेरकर

[आवृत्ति पहिली] किंमत दीड रुपया [जानेवारी १९५०

तारीख एक जानेवारी एकोणीसशेंपन्नास रोजीं परळवरील दामोदर ठाकरसी हॉलमधें सर्वोदयकलामंदिराच्या नाट्यशाखेनें या नाटकाचा पहिला प्रयोग केला. त्याकामीं खालील कलावंतांनीं नाटकांत भाग घेतला होता:—

| | |
|---|---|
| **जिवा** | दीनानाथ टाकळकर |
| **मोती** | दत्ताराम वळवईकर |
| **गोपाळ** | श्रीनिवास जोशी |
| **रेणुका** | सुशीला शेजवाडकर |
| **शिवा** | परशुराम सामंत |
| **मंदा** | मंगला पितळे |
| **रुपा** | अन्ता वर्तक |
| **पाटील** | सुकुमार नागोटकर |
| **गुरव** | आफळे |
| **नोकर** | उद्धव रंगारी |
| **बेलिफ** | सीताराम नाटेकर |



| | |
|---|---|
| **दिग्दर्शक** | चिंतामणराव कोल्हटकर |
| **संगीत दिग्दर्शक** | सुंदराबाई जाधव |
| **निर्माता** | मामा वरेरकर |
| **सहाय्यक** | मधुसूदन बस्तीकर |
| **स्टेज मॅनेजर** | शंकर बुधे |



## भेटीपूर्वी—

स्वातंत्र्यप्राप्तिनंतरचें माझें हें पहिलें नाटक. एकोणीसशें आठ सालीं माझें पहिलें नाटक 'कुंजविहारी' खामगांव येथें रंगभूमीवर आलें, त्यावेळीं भारताला स्वातंत्र्य येईल आणि स्वातंत्र्याच्या कालांत आपण नाटक लिहूं असें वाटलेंसुद्धां नव्हतें. पण आज तसें झालें आहे.

हें नाटक सर्वस्वी नवीन आहे असें नव्हे. एकोणीसशें सदतीस सालीं याच कथानकावर एक चित्रपटकथा मी लिहिली होती. ती चित्रित करण्याचा योग न आल्यामुळें माझ्या 'पूर्णिमा' साप्ताहिकांत त्या कथेवर आधारलेली कादंबरी 'सात लाखांतील एक' या नांवानें एकोणीसशें चाळीस सालीं क्रमशः प्रसिद्ध होऊन पुढें ती पुस्तक रूपानेंही प्रसिद्ध झाली. सामान्य वाचकाला ही कादंबरी आवडली असल्याचें कळून आलें, तरीही परीक्षकी नियतकालिकांनीं तिची क्वचितच दखल घेतली. पुढें या कादंबरीला चित्र-पटासाठीं बऱ्याच मागण्या आल्या, पण माझ्या विशिष्ट कल्पनेप्रमाणें तिचें चित्रीकरण होण्याची खात्री न मिळाल्यामुळें तशी परवानगी देण्याचें मी नाकारीत आलों.

या कथानकांत माझा जीव गुंतून गेला होता. तें दृश्य स्वरूपांत पाहाण्या-साठीं माझें मन आसुसलें होतें; पण ज्या प्रकारचें वातावरण निर्माण करणें या नाटकाच्या प्रयोगासाठीं अवश्य होतें, तसें तें निर्माण करण्यासाठीं आजवर वाट पाहात राहावें लागलें.

स्वातंत्र्य आलें आणि त्याच्या पहिल्या वाढदिवशीं मुंबई प्रांतिक कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. सदाशिव कान्होबा पाटील यांच्या अध्यक्षतेखालीं 'सर्वोदयकला-मंदिर' ही, रंगभूमीच्याद्वारें लोकशिक्षणाचें कार्य करण्याचें ब्रीद मिरवणारी संस्था अस्तित्वांत आली. स्वातंत्र्याच्या दुसऱ्या वाढदिवसानंतर मुंबई सरकारचे प्रधानमंत्री श्री. बाळ गंगाधर खेर यांच्या प्रेरणेनें अस्तित्वांत आलेल्या 'रिक्रिएशन बोर्ड' आणि कमिटीनें या संस्थेला एक लाख रुपयांची प्रथम वार्षिक देणगी देऊन मंदिराची नाट्यशाखा अस्तित्वांत आणणें शक्य केलें. त्याचें पहिलें दृश्य फळ म्हणजे हें नाटक.

सर्वसाधारण धंदेवाईक नाटकसंस्थेला हें नाटक रंगभूमीवर आणणें सोपें झालें नसतें. नाटकाचें कथानक जितकें खेडवळ आहे तितकेंच त्याचें वातावरणही सामान्य प्रेक्षकाचें आकर्षण करायला असमर्थ ठरण्याजोगें आहे. धंदेवाईकांना हें नाटक पेललें नसतें, म्हणूनच हा वेळपर्यंत वाट पाहावी लागली.

आज खेड्यांतल्या परिस्थितीवर आधारलेलीं नाटकें व कादंबऱ्या लिहिल्या जात आहेत, त्यांच्याकडे पाहिल्यावर हें कथानक त्या कोणत्याही पुस्तकांपेक्षां जास्त खेडवळ आहे असें दिसून येईल. या नाटकांत एकही पांढरपेशा नाहीं. कथानकाचा मध्यबिंदू खेड्यांतल्या लोहारांच्या चरित्रावर केंद्रित झालेला, नाटकाची प्रभाळ दारिद्र्याची, आजच्या प्रेक्षकाला आकर्षक होईल अशा वैभवशाली दृश्यपटांचा पुरेपूर अभाव, दुःखाचीं आणि दारिद्र्याचीं दृश्यें सर्वत्र विखुरलेलीं, कथानकाचा शेवट वियोगान्त झालेला, अशा सर्व प्रकारच्या प्रतिकूलतेंतून निर्माण झालेलें हें नाटक कितपत लोकप्रिय—म्हणजे भरपूर पैसा देणारें—होईल याची खात्री नसतांही केवळ ध्येयवादावर नजर ठेवूनच तें रंगभूमीवर आणण्याचें धाडस सर्वोदयकलामंदिराच्या अस्तित्वामुळेंच करतां आलें आहे.

आर्थिक भांडवलशाही हा आज जगाच्या राजकारणाचा प्रमुख विषय आहे. धार्मिक भांडवलशाली हा शब्द जरी सकृत्दर्शनीं नवा वाटला तरीही तिची जाणीव साऱ्या जगाला दुःखदायक झाली आहे हें कुणालाही नाकबूल करतां येणार नाहीं. एका लहानशा पंचांगावर एखादा भिक्षुक, देवाच्या कौलाच्या जोरावर एखादा गुरव आणि लिंबू, नारळ, कोंबड्या, बकऱ्याच्या जोरावर एखादा भगत बहुजनसमाजावर जो अधिकार आजवर गाजवीत आला आहे, तो एखाद्या जुलमी हुकुमशहालासुद्धां गाजवतां आला नसेल. या धार्मिक भांडवलशाहीच्या पायीं आज भारतांतल्या खेड्यांची धुळधाण उडालेली आहे. तिच्या या सैतानी पकडींतून शहरें देखील सुटलेलीं नाहींत; पण अशिक्षित आणि असंस्कृत खेडवळांचें या भिक्षुकी व देवस्कीच्या पायीं जें नुकसान झालें आहे त्याला मात्र जगाच्या इतिहासांत तोड नाहीं.

खेड्याच्या सुधारणेसाठीं आमच्या सरकारनें किती तरी नवे उपाय योजायला सुरवात केली आहे. साक्षरता प्रसार हा त्यांतला मोठ्यांतला मोठा प्रयोग होय. पण साक्षरता म्हणजेच कांहीं सर्वस्व नव्हे—सुशिक्षण म्हणजे कांहीं अज्ञानाचें

निर्मूलन नव्हे, तसेंच खेड्यांतल्या खेडवळाला शेतीच्या सुधारणेनें आर्थिक संपन्नता मिळवून देणें म्हणजेच कांहीं कल्याणाचें साधन नव्हे. सुशिक्षणाच्या पायीं खोट्या धर्मसमजुतीचें उच्चाटण झालें असतें तर सुशिक्षितांत देखील दिसून येणारा अवास्तव धर्मभोळेपणा केव्हांच नाहींसा झाला असता.

देवस्की हे मोठें प्रस्थ आहे.—एक भयानक अस्त्र आहे. या अस्त्राचें उच्चाटण कायद्यानेंच झाले पाहिजे. या अस्त्राच्या परिणामांचें पुसटतें दृश्य या नाटकाचे द्वारें सामान्य माणसाला जाणवलें, सरकारची कार्यप्रवण नजर अल्पशा प्रमाणांत जरी तिकडे वळली, तरी या नाटकानें बरेचसें कार्य केलें असें म्हणतां येईल. निदान लोकसमाजाला जरी हे जाणवलें तरी पुष्कळ झालें.

कादंबरीवरून नाटक लिहिलें जावें कीं नाहीं असा एक वाद वृत्तपत्रांमधून अलीकडे सुरू झाला होता. परदेशांत सर वॉल्टर स्कॉटच्या कालापासून असें होत आलें आहे. आजही होत आहे. बंगालचे प्रख्यात लेखक शरच्चंद्र चट्टोपाध्याय ( शरद्‌बाबू ) यांनीं आपल्या दोन तीन कादंबऱ्यांचीं नाटकांत रूपांतरें स्वतः केलीं होतीं. आज त्यांच्या निधनानंतरसुद्धां त्यांच्या भक्तांनीं नाटक-स्वरूपांत केलेलीं त्यांच्या कादंबऱ्यांचीं रूपांतरें आज तारखेपर्यंत बंगालची रंगभूमी गाजवीत आहेत. या बाबतींत मराठी वाङ्मयांत पूर्वीपासूनच उपेक्षा होत आली आहे. हरिभाऊ आपटे यांच्या प्रभावी कादंबऱ्या काय रंगभूमीवर यायला अनुरूप नाहींत ?

'धांवता धोटा' या माझ्या कादंबरीवर आधारलेलें माझें 'सोन्याचा कळस' हें नाटक उण्यापुऱ्या दीड तपापूर्वी रंगभूमीवर येऊन अजूनही पहिल्या इतकेंच लोकप्रिय होऊन राहिलें आहे. मात्र त्या नाटकांत त्यावेळच्या परकी सरकारच्या निर्बंधांमुळें बरेचसे फेरफार करावे लागले होते. पात्रांच्या स्वभाव-धर्माप्रमाणें कथानकांतही बराच भाग उणाअधिक करावा लागला होता. आतां आमचें राज्य झालेलें असल्यामुळें या नाटकांत तसें कांहीं करण्याची आवश्यकता राहिलेली नाहीं.

नाटकाच्या प्रयोगाचा कालावधि पूर्वीच्या कालच्या कालावधीपेक्षां कमी झालेला असल्यामुळें मूळ कादंबरीतल्या प्रसंगांच्या व्याप्तीचा या नाटकांत

बराचसा संकोच करावा लागला आहे, त्यामुळें कदाचित् थोडीशी उणीव भासेल अशी भीति वाटते. फरक केला आहे तो एवढाच.

या नाटकाच्या प्रयोगाच्या कामीं ज्यांनीं ज्यांनीं मला सहाय्य केलें, त्यांचा त्यांचा मी अत्यंत आभारी आहें.

हाजी कासम वाडी
मुंबई नं. ७
गुरुवार ता. २९।१२।१९१९

भा. वि वरेरकर

# या ग्रंथकाराचीं पुस्तकें

**नाटकें**:—कुंजविहारी, संजीवनी, सरस्वती, वरवर्णिनी, हाच मुलाचा बाप, समर्थ भिकारी, लयाचा लय, संन्याशाचा संसार, सत्तेचे गुलाम, तुरुंगाच्या दारांत, नवा खेळ, करग्रहण, करीन ती पूर्व, सोन्याचा कळस, जागती ज्योत, स्वयंसेवक, समोरासमोर, कोरडी करामत, उडतीं पांखरें, माझ्या कलेसाठीं, सारस्वत, त्याची घरवाली, भाग्याचा भगवंत, रंगभूमीच्या वाटेवर, चला लढाईवर, न मागतां, सिंगापुरांतून, संन्याशाचें लग्न, धरणीधर, खेळघर, दौलत–जादा, कागदी जवान, जिवाशिवाची भेट.

**लघुनाटकें**:—वज्रकुसुम, पापी पुण्य, संसार, नामानिराळा, सदा बंदिवान, आजचे संवाद, कडकलक्ष्मी, जागलेली आई.

**कादंबऱ्या**:—संसार कीं संन्यास ?, चिमणी, विधवाकुमारी, गोदू गोखले भाग १।२, धांवता धोटा, परतभेट, कुलदैवत, उघडझांप, विकारी वात्सल्य, वेणू वेलणकर, उमलती कळी, न पुजलेली देवता, मलबार हिल, लढाईनंतर, कुणाचा हा देश ?, भानगड गल्ली, पेटतें पाणी, सात लाखांतील एक, तरतें पोलाद, गीता, फाटकी वाकळ, मी—रामजोशी, शिपायाची बायको, द्राविडी प्राणायाम, तोंडमिळवणी, झुलता मनोरा.

**लघुकथा संग्रह**:—स्वैरसंचार, षोडशी, वैमानिक हल्ला व इतर गोष्टी, एकादशी.

**शरद्बाबूंचे अनुवाद**:—श्रीकांत भाग १।२।३।४, गांवगंगा, भैरवी, विजया, काशिनाथ, माधवी, विराजवहिनी, विप्रदास, परिणीता, पंडित—महाशॅय, चंद्रनाथ, शेष प्रश्न, शुभदा, अनुराधा, अभागीचा स्वर्ग, नव-विधान, अरक्षणीया, सव्यसाची, गृहदाह, अखेरची ओळख, मंदिर व इतर गोष्टी, चरित्रहीन, छोटा भाई.

**इतर**:—आघात (व्याख्यानें), माझा नाटकी संसार (आत्मचरित्रात्मक), श्रुतिका (श्राव्य प्रकरणें), पुनः आघात (व्याख्यानें), सात अवस्था, माझी कैफियत, खुळ्या लकेऱ्या.

# अंक पहिला

## ( प्रवेश १ ला )

[ जिवा लोहारचें घर. घराच्या ओसरीचा भाग मागल्या बाजूला दिसत आहे. त्याच्या मध्यभागीं दरवाजा आहे आणि त्या दरवाज्याच्या पुढेंच पायऱ्या आहेत. ओसरीच्या दोन्हीं बाजूंच्या धक्क्यावर व्यवस्थितपणें गुंडाळून ठेवलेल्या दोन वळकट्या आहेत. खालीं शिंदीच्या चटया टाकलेल्या आहेत. ओसरीच्या भिंतीच्या खुंट्यांवर कपडे टांगलेले आहेत. रंगभूमीचा पुढला भाग हा घराच्या छपराला धरून पुढें उभारलेला मंडपवजा आहे. त्या भागांत आजूबाजूला बरीचशी लोखंडी सामानाची अडगळ पडलेली आहे. या मंडपांतील उजव्या बाजूला मध्यापासून उजवीकडे सरकलेल्या जागीं भट्टी असून तिला जोडून भाता आहे. त्या भात्याच्या शेजारीं जिवा लोहार हातांतल्या चिमट्यांत धरलेला लोखंडाचा तुकडा भट्टींत तापवून घणावर ठोकीत आहे. एक वीत उंचीच्या घडवंचीवर त्याचा मुलगा मोती बसलेला असून तो भात्याची दोरी ओढीत आहे. जिवा लोहारार्चे वय पन्नाशीच्या आंत असावें. शरिरानें मजबूत, पीळदार अंग, विशेषतः बाहू आणि मनगट पीळदार आहेत. गर्दन मोठी, डोळे अत्यंत सतेज, कुणाकडेही पहातांच नजरेसरशीं विजेचा झटका बसण्या-जोगे, बोलण्याची पद्धक गुरगुरल्यासारखी, नुसता हुंकार दिला तरी देखील तो वाघाच्या गुरगुरीसारखा. त्याचा मुलगा मोती सुमारें २०-२१ वर्षांचा, शरीर प्रकृतीनें सुदृढ असला तरी जिवाच्या मानानें एकंदरींत नाजूकच, दृष्टी स्वप्नाळू आणि तरळलेली. मोतीच्या हातांत पुस्तक असून त्यांतील एक कविता तो आपल्याशीं गुणगुणत आहे, त्यामुळें दोरी ओढण्याकडे ज्यावेळीं त्याचें दुर्लक्ष होतें तेव्हां जिवा त्याला "मोत्या" म्हणून हटकतो आणि तो दचकून जोरजोरानें दोरी ओढूं लागतो आणि त्याबरोबर त्याचा कविता म्हणण्याचा सूरही पदोपदीं वाढत जातो. इतक्यांत गोपाळ सुतार प्रवेश करतो आणि एक क्षणभर

त्या दोघांकडेही पाहून घेतो. गोपाळचें वयही जिवा इतकेंच आहे. अंगांत सदरा, डोक्याला रुमाल, धोतर जरा निटनेटकेपणानें नेसलेलें आणि स्वच्छ, मुद्रा प्रेमळ, बोलण्याची ढब पांढरपेशा वळणाची. पडदा वर गेल्यापासून दूर अंतरावरून भजनाच्या दिंड्यांचा आवाज ऐकूं येत आहे. एक क्षणभरच थांबून गोपाळ जिवाच्या पुढें येतो. ]

**गोपाळ :** काय जिवबा, येणार ना मिरवणुकीबरोबर ?

**जिवा :** ( हातांतल्या चिमट्यांतला लोखंडाचा तुकडा दाणूकन् फेंकून गुरगुरत ) मिरवणूक ! हंः ! ( लोखंडाचा तुकडा पुन्हा चिमट्यांत धरून भट्टींत खुपशीत खुपशीत ) मिरवणूक म्हणे ! कसल्या मिरवणुकी काढतां ? घरांत पोरंबाळं उपाशीं मरताहेत-त्यांच्या पोटाला चिमटे घेऊनच ना या मिरवणुकी काढतांहां ? नाचताहेत लेकाचे ! नाचायला त्राण आहे का पायांत ? आहे का पोटांत अन्न ?

**गोपाळ :** ( भीत भीत ) पण देवासाठीं—

**जिवा :** ( ताड्कन उठून उभा राहून ) देवासाठीं म्हणे देवासाठीं ! माणसं मारून का देवाची भर करायची ? धंदा बुडाला, उदीम बुडाला, एक गिऱ्हाईक सुद्धां येत नाहीं दाराशीं, दांताखालीं धरायला चार जोंधळ्याचे दाणे सुद्धां नाहींत घरांत अन् सांठ्याचीं पागोटीं चढवून मिरवताहेत मिरवणुकींतून ! टिपऱ्या खेळताहेत ! त्यापेक्षां डोकीं आपटा म्हणावं एकमेकांवर ! गोफ विणताहेत ! लंगोटीला फडकं नाहीं घरांत आणि गोफासाठीं ताके फाडताहेत कापडाचे ! सांग-तूं सुतार आहेस, तुझा बापही सुतार होता, पूर्वीसारखं काम येतंय का तुझ्या दाराशीं ? मी हा भाता फुंकीत बसलोंय, पण काम कुठंय ? खटारेच पडले मोडून तिथं धांवा कुठल्या आणि आंस कुठले ? मोटारी आल्या आहेत ना विलायती ? आतां कुणाला हवेयत खटारे ! हंः ! नाल मारीन म्हटलं तर गावांत बैलसुद्धां नाहींत—

**गोपाळ :** तुम्हीं नाल मारणार ? नालबंद नव्हे तुम्हीं. जातीवंत खानदानी लोहार तुम्ही—

**जिवा :** नालच कां, या भट्टींत पाणी ओतून चांभाराचं सुद्धां काम केलं असतं, पण आहे कुठं काम ? चांभाराला सुद्धां काम नाहीं ! आयते बूट

येताहेत विलायतेंतून ! बैलांच्या घंटाचे पट्टे बांधायला सुद्धां कुणी येत नाहीं चांभाराच्या दाराशीं ! गुरंढोरं चालली आहेत ना कसाईखान्यांत--

**गोपाळ** : नाहीं येत तुम्हीं ? मी जातों तर—

**जिवा** : जा, मरा ! काढा मिरवणुका ! मातीची बाहुली पालखींतून मिरवण्यासाठीं हाडामांसाच्या चालत्या-बोलत्या माणसांना जिवं मारा—जा ! अरे हा चालता-बोलता देव—हा साडेतीन हाताचा माणूस—याच्या भुकेल्या तोंडांत घांसभर अन्न घालायच्या ऐवजीं देवाला नैवेद्य दाखवून गुरवाची भर करताहेत शेंबडीचे !—

[ घाबरलेली रेणुका प्रवेश करते. रेणुका ही जिवाची बहीण आहे. ती विधवा आहे. वयानें सुमारें पस्तीशीच्या आगें मागें. गंभीर, शांत मुद्रा, डोळे तेजस्वी पण एकप्रकारच्या करुणाजनक छटेनें पांगुळलेले. तिच्या बोलण्यांत आणि वागण्यांत सदोदित भित्रेपणा दिसून येत असतो. यावेळीं मात्र ती फारच घाबरलेली आहे. ती येतांच गोपाळ सुतार तिच्या नजरेला पडूं नये अशा वृत्तीनें झट्कन् बाजूला होतो. ]

**रेणुका** : मंदा आलीय का इथं ?

**जिवा** : आली असती इथं तर दिसली नसती का ?

**रेणुका** : इथनं कुठं जातांना दिसली का ?

**जिवा** : एकदां सांगितलं ना तुला—ती इथं आली नाहीं, ती इथं यायची नाहीं, मी तिला इथं येऊं देणार नाहीं, आलीच तर बखोटीला धरून घराबाहेर काढीन ! माझा मी समर्थ आहें, पण माझ्यासाठीं दुसऱ्या कुणाल नको त्रास व्हायला—

**गोपाळ** : ( हळूच दुरून ) मिरवणुकींत पाहिलीस का ?

[ गोपाळाचा आवाज ऐकतांच रेणुका दचकते. झट्कन त्याच्यावरची नजर फिरवून, कुणाकडेसुद्धां न पाहातां अधिकच घाबरून बोलते. ]

**रेणुका** : मी विधवा—मी कशी जाऊं त्या मिरवणुकींत ? वाटलं, इथं दादाकडे आली असेल—

**जिवा :** जा पाहूं आतां इथून. आधीं मिरवणुकींत पहा! कशाला मला उगीच–!

**मोती :** ( आतापर्यंत स्तब्ध बसलेला, पाहून ताडकन् उठून ) ती पहा–ती पहा!—

**गोपाळ :** कुठं ?–कुठं ?––

**मोती :** ती पहा–( असें म्हणून ताड्कन् उठून जातो. गोपाळही ताड्कन् उठून जातो. )

**जिवा :** जा ना. थांबलीस कां ?—धांव ना त्याच्यामागें ?

**रेणुका :** तुला कांहीं काळीजच नाहीं का दादा ? त्यांच्या मागून मी जाऊं ?

**जिवा :** ( गुरगुरत ) हंः! त्याच्या मागून तूं! हंः! गेली असतीस–जोडीनं सुद्धां राहिली असतीस–पण जात आडवी आली ना? सुतार तो–विश्वकर्मा ब्राह्मण म्हणवतात ना ते! आम्हीं लोहार म्हणजे शूद्र–कसला शूद्र आणि कसला ब्राह्मण! देवाघरच्या माणसाला हा जातीचा टिळा कशाला? गोपाळ होता वरच्या जातीचा, तरीसुद्धां बाबांना पटलं नाहीं अन् त्या दारुड्याच्या गळयांत बांधली तुला. सत्यानाश झाला तुझ्या आयुष्याचा-आणि गोपाळच्या देखील! हंः! असं चाललंय हें! समंधासारखा एकटाच असतो तो घरांत आणि तूं देखील ही अशी—

**रेणुका :** ( रडकुंडीला येऊन ) आतां उगी राहशील दादा ?

**जिवा :** कां? तेव्हां सुद्धां उगी राहिलों नाहीं. भांडलों बाबांबरोबर. कुणी सुद्धां ऐकलं नाहीं माझं. नास्तिक ना मी? सत्यार्थप्रकाश वाचीत होतों–दयानंदाचा भक्त म्हणून गाढव म्हणत होते मला सारे! गाढवच आहें अजूनपर्यंत. असल्या या माणसांपेक्षां गाढवपणा बरा! ( बाहेर गलगा ) *सांपडली वाटतं ?*

[ शिवा लोहार धक्के मारीत मंदाला घेऊन येतो. त्यांच्या मागोमाग गोपाळ आणि मोती येतात. शिवाचं वय जिवापेक्षां पांच सहा वर्षांनीं कमी असावें. तो मिरवणुकीच्या थाटाच्या पोषाखांत आहे. मंदा रेणुकेची मुलगी. वयानें उण्यापुऱ्या सोळा वर्षांची. सदा हांसरी. वृत्तीनें अवखळ. वागणुकीनें चपळ. मुद्रा सतेज पण बेफाम. ]

**शिवा :** कितीवेळ सांगितलं तुला, कीं पुरुषांच्या मेळाव्यांत जाऊं नको. न्हातीधुती पोरगी तूं–निघाली आपली हुंदडत! कांहीं वडील माणसांची कदर आहे कीं नाहीं? पण तुला पर्वा कुठंय कुणाची? जशी आई तशी कारटी—

**जिवा :** (बसल्या जागेवरून ताड्कन उठून, दरडावून) शिवा!

**शिवा :** हो–हो–जशी आई तशी कारटी. लाजा शरमा नाहींत कुणालाच. खबरदार यापुढं उंबरठ्याबाहेर पाऊल टाकशील तर. अब्रूच ठेवलीय साऱ्यांनीं गुंडाळून. कुणी वडील माणूस राहिलं नाहीं ना वर! आतां वडील मीच आहें म्हणावं. घरचा मालक मीच आहें–(मंदा हंसते) हंसतेस काय? मार नाहीं लागत? हें घे–(मारतो) रामोश्याचं बीज कुठलं!

**जिवा :** हां हां, शिवा, जादा बातीचं काम नाहीं. (त्याचा दंड धरून त्याला दूर ओढून घेऊन) हिचा बाप जर रामोश्याचं बीज तर तूं रे कोण? वडील भाऊ होता ना तो तुझा? आज जिवंत असता तर छाती झाली असती का असं बोलायची?

**शिवा :** सोड माझा हात–जीव घेणार आज मी हिचा! ढीग सहन केलं, पण आज निकालच लावतों! सणासुदीच्या दिवशीं साऱ्या गांवांत नाचायला लावलं मला. कांहीं रीतभात आहे कीं नाहीं! खुशाल घुसत होती गर्दीतून सर्वांच्या धक्क्या खात! अशानं काळोखी लावशील आमच्या कुळाला! आणि हा शहाणा मला अक्कल शिकवतो! मला? मला, या शिवा लोहारांला! हा जिवा मला अक्कल शिकवतो! (मंदाला बडवीत) जाशील पुन्हां बाहेर?

**मंदा :** (हुंदके देत हंसत) जाईन–पुन्हां जाईन–एकदां जाईन–दहादां जाईन–शंभरदां जाईन–हजारदां जाईन! मारा म्हणावं–जीव घ्या म्हणावं!

**शिवा :** (तिला खसूकन ओढून) जीव घेईन म्हणजे सोडीन कीं काय? जीव घेईन–मुडदा पाडीन–काय वाटेल तें करीन! घराच्या अब्रूपेक्षां मला पर्वा नाहीं तुझ्या जिवाची—

**रेणुका :** (शांतपणें पण दरडावणीच्या आवाजांत) तुमच्या इतकीच घराच्या अब्रूची चाड आहे मला भाऊजी—

**शिवा :** ( एकदम मागें वळून ) आतां तुम्हीं आलां कैवार घ्यायला ! मी पालक आहें या पोरीचा. मी काय वाटेल तें करीन–जीव घेईन–हा असा– ( पुन्हां मारतो )

[ मोती ताड्कन् जाऊन शिवाचे दोन्ही हात धरून त्याला बाजूला ओढतो ]

**शिवा :** तूं ! तूं ? तूं हात लावतोस माझ्या अंगाला ?

**मोती :** किती मारतां तिला ? तिची आई आहेच तिला शिक्षा लावायला. तुम्ही कशाला एवढी तसदी घेतां ?

**शिवा :** तर काय तुला मारूं ? माझ्या पोरीला मी काय वाटेल तें करीन ! तूं कोण मला विचारणार ?

**मोती :** माझी पोर म्हणे ! कायदा आहे ना ? आई आहे ना तिची ?

**शिवा :** मला कायदा सांगतोस ? लाळघोट्या, तूं बिघडवलंस या पोरीला. भलतेसलते नाद तूं लावलेस हिला. तुझ्यामुळं ही भिरभिरते साऱ्या गांवभर– ( रेणुकेला ) पाहातां काय नुसतं ? ओढा त्या पोरीला आणि न्या घरीं. दिसत नाहीं हा जिभ्याचा कारटा—

**मोती :** ( अस्तन्या सारीत ) जिभ्याचा कारटा काय ?

**शिवा :** काय करशील रे ? मारशील मला ? मार पाहूं ? काय तुझी थोबडी लागलीय !

**जिवा :** बस् झालं ! रेणू, इथनं घेऊन जा पाहूं तुझ्या पोरीला. माझ्यासमोर नकोत हे धिंडवडे ! स्वस्थ राहून बघणं कठीण जातंय मला. मोत्या हट मागं !

**मंद्गा :** मी नाहीं जाणार इथून. आई नको आणि काकाही नकोत ! कुणाचंच ऐकायची नाहीं मीं ! मी जाणार मिरवणुकीबरोबर !

**जिवा :** कशी जातेस मिरवणुकींत तें पहातों आतां—( तिची मानगुटी पकडतो. )

[ तोंच रुपा लोहार येतो. तो धंदेवाईक लोहार नाहीं. गांवचा सावकार आहे. त्याचा पोषाख ब्राह्मणी थाटाचा आहे. सदा हांसतमुख.

मिस्कील नजरेचा. बोलतांना उगीच डोळे मारण्याची संवय. जिवणीतून हंसायची खोड. ]

**रुपा** : हें काय शिवाजीबुवा, तुम्हीं या पोरांबरोबर लागतां ? दूर हो मोत्या–

[ मोती दूर होतो. पण तो रुप्याच्या दरडावणीनें नव्हे, रणुकेनें दटावल्यामुळें. मोतीनं शिवाचा हात सोडला आणि शिवानें मंदाचा हात सोडला. हात सुटतांच मंदा बाहेर जाऊं लागली, तेव्हां तिला रुपा अडवतो. ]

**रुपा** : ( मंदेला ) उगी ! उगी ! रडूं नकोस !––

**मंदा** : कोण रडतंय ? ( खदखद हंसून ) काका पाठ थोपटीत होते माझी. शाबासकी देत होते. मी धीटकुली आहें म्हणून तारीफ करीत होते माझी. चला, सोडा माझी वाट !

**रुपा** : ( तिचा हात धरून ) थांब मंदा–( मंदा रुपाच्या हातावर ताड्कन थप्पड मारते )

**शिवा** : हात लोटतेस त्यांचा कारटे ? रुपाजीरावाचा ? भाग्य हवं त्यांचा हात लागायला ! केवढा मोठा माणूस आहे तो. मामलेदारसुद्धां लवून रामराम करतात त्यांना ! कलेक्टर साहेबसुद्धां बोलावतात त्यांना आपल्या बंगल्यावर ( जिवा आणि मोती मोठमोठ्यानें हंसतात ) हंसतां काय मूर्खानों ?––

**जिवा** : असं पहा शिवा, तुला हें कळायला हवं होतं. घराच्या अब्रूची काळजी आहे ना तुला ? कुंवारीण आहे ती–परक्या पुरुषानं हात धरला तर फटका नाहीं का मारायची ?

**रुपा** : अगदीं बरोबर ! तुम्हांला हें कळलं पाहिजे होतं शिवाजीराव ! कांहीं चुकलं नाहीं तिचं ! आणि असं पहा रेणुकाबाई, मुलं वेडी असतात, त्यांना कांहीं कळत नाहीं. कुणाची संगत कुणाला लागली तें पाहिलं पाहिजे. देवाधर्माला भिऊन वागणारीं माणसं आपण, दूर राहिलं पाहिजे नास्तिक माणसांपासून. अस्सल जातिवंत लोहार आहोंत आपण. ती बायको व्हायची आहे माझी. देवाधर्मांची चाड पाहिजे तिला ! मी शिकलोंसवरलों असलों तरी देवधर्म सोडला नाहीं कांहीं ! कुळ राखलं पाहिजे मला ! कुणी एवढंसुद्धां नांव ठेवतां नये माझ्या बायकोला ! समजलं ?

**जिवा :** समजलं ! झालं ? आतां जा पाहूं इथून. तुमचीं हीं भांडणं माझ्या दारीं कशाला भांडतां ? तुमचीं घरं नाहींत तुम्हांला ? जा पाहूं इथून. आणि तूं ग रेणु !–हंः–तूं काय करणार आहेस म्हणा ! कोण आहेत ते तुझे ! हवी तर जा नाहींतर नको जाऊंस, पण हीं पोरं जाऊं देत आधीं ! तें भांडणाचं मूळ नको माझ्या दारीं. ( ते जिवाचें भाषण ऐकण्यांत गुंतलेले आहेत असें पाहून मोतीला खुणावून मंदा पळून जाते ) बरं का रुप्या, माझं ऐक–गेली वाटतं ती ? बरं का रुप्या, तुला तिची काळजी नको. तिची आई समर्थ आहे तिची काळजी घ्यायला. लग्न व्हायला अजून ढीग अवकाश आहे, एव्हांच सत्ता गाजवूं नकोस कुणावर ! आणि निघां पाहूं दोघे इथून !—

( हें भाषण चाललेलें असतांना सर्वांचा डोळा चुकवून मोती गेलेला असतो )

**रुपा :** असं पहा जिवाजीराव—

**जिवा :** अरे कसला जिवाजी आणि कसला राव घेऊन बसला आहेस ! जा पाहूं इथून ! समजलास रुपा, तुझ्या मामलेदारालाही मी ओळखतों आणि तुझ्या कलेक्टरालाही ओळखतों–आणि तुला तर चांगलाच ओळखतों ! मुखस्तंभासारखा काय राहिलाहेस शिव्या ? या गांवगुंडाला बाहेर काढ माझ्या घराच्या !

**शिवा :** बरं बरं, मला तरी इथं कुठं रहायला हवंय ? चला रुपाजीराव—

**रुपा :** चला, मिरवणूक खोळंबली आहे तिकडे ! तुम्हीं आम्हीं गांवचे मानकरी. आपण जर असे दूर राहूं लागलों तर मिरवणूक पार पडायची कशी ? ( रेणुकेला ) चांगली सांभाळा बरं तिला. आतां थोडेच दिवस राहिले आहेत. पहिल्याच मुहूर्तावर उरकून घ्यायचं आहे मला ! अशी एकटी बाहेर जाऊं देऊं नका. जायचंच असलं तर तुम्ही जा बरोबर. पुरुषाबरोबर जाउं देउं नका. समजलं ? मामेभाऊ सुद्धां जवळ नसावा–तो सुद्धां परपुरुषच ! ध्यानांत ठेवा चांगलं—( शिवाचा हात धरून त्याला बरोबर घेउन जातो )

[ एक क्षणभर स्तब्धता. जिवा जाऊन भट्टीजवळ बसतो. गोपाळ एका कोंपऱ्याला जातो. रेणुका शिवाच्या बाजूला गोपाळकडे पाठ करून येऊन उभी राहते. ]

**रेणुका :** ऐकलंस ? पाहिलंस ?

**जिवा :** मी दगड आहे म्हणून सांगितलं ना तुला ? जा आतां. घटकाभर स्वस्थ बसूं दे मला—

( तो स्वतःच भात्याची दोरी डाव्या हातानीं ओढूं लागतो अन् उजव्या हातानें चिमट्यांत लोखंडाचा तुकडा घेउन खुपसतो. गोपाळ मुकाट्यानें उठून जड पावलानें निघून जातो. भट्टींतल्या विस्तवाकडे पहात जिवा आपल्याशींच हंसत असतांना पडदा पडतो. )

## प्रवेश दुसरा

[ गांवाच्या बाहेरची एक वळचणीची जागा. मोती आणि मंदा बोलत बोलत येत आहेत. ]

**मोती :** कुणी पाहिलं नाहीं ना आपल्याला ? एवढीच ही एक बिनधोक जागा आहे. अजून कुणी हेरलेली नाहीं. म्हणून निवांतपणें इथं येऊन बोलतां तरी येतं तुला मला.

**मंदा :** किती दिवस हा असा चोरटेपणा चालायचा ? अन् ही चोरी तरी कां ? काय म्हणून कुणाला भ्यायचं ?

**मोती :** असं पहा मंदा, जगाचे व्यवहार आपल्याला कळत नाहींत. बाबा म्हणतात, धर्माचं नांव कुणी किती जरी घेतलं तरी जग चाललंय तें कायद्याच्या आधारावर—

**मंदा :** जिवामामाचं आपलं जगावेगळंच बोलणं. कोण विचारतोय कायद्याला ? इथं या असल्या आपल्या लहानशा गावांत कुणाला माहीत आहेत कायदे ? पाटील म्हणेल तो कायदा अन् त्या पाटलाचा देव रुपा. त्या रुपाची बात म्हणजेच कायद्याची बात ! खरा कायदा कुठं कुणाला माहित आहे ?

**मोती :** तें खरं आहे ग ! पण कायदा म्हणून कुठंतरी आहे अन् केव्हां ना केव्हां तरी त्याच्या पकडींत जावं लागतं आपल्याला ! तूं ही अज्ञान, तुझा पालक आहे तुझा काका, तुझ्या आईची कांहीं सत्ता नाहीं तुझ्यावर—कायदा आहे तो हा आणि म्हणूनच भीति वाटते मला.

**मंदा** : मग आतां करायचं काय ?

**मोती** : तेंच तर कळत नाहीं ना मला! बाबांकडे बोलायची सोयच नाहीं. गोपूकाकांना कांहीं विचारीन म्हटलं तर ते आहेत मुलखाचे भित्रे. सर्वांनाच भीतात! अन् ते तरी काय सांगणार म्हणा! एकच उपाय दिसतो आतां—( थांबतो )

**मंदा** : बोल ना! कसला उपाय दिसतोय तुला ?

**मोती** : कांहीं अर्थ नाहीं तो बोलून दाखविण्यांत! मला तर सारा अंधार दिसतोय. चोहोंकडून घेरून टाकलंय या गुलामानं—

**मंदा** : असं म्हणूं नये. वडील माणसं आहेत तीं—

**मोती** : ( चिडून ) रुपासुद्धां वडील का ?

**मंदा** : हो तर! त्याच्या पहिल्या बायकोची पहिली मुलगी हयात असती तर माझ्यापेक्षां दोन वर्षांनीं मोठी असती—नाहीं ?

**मोती** : हो! तो सुद्धां वडीलच माणूस आहे म्हणायचा—

**मंदा** : मग ?

**मोती** : मग काय ? तुझ्या आईचा विरोध नाहीं, माझ्या बाबांचा विरोध नाहीं, मग हे कोण ? कसली यांची सत्ता ? काय केलंय यांनीं तुझ्यासाठीं ? काय तुला पोटभर खायला घातलंय, कीं तुझ्यासाठीं कसल्या खस्ता काढल्या आहेत ? काय म्हणून तुझ्यावर त्यानं सत्ता गाजवावी ?

**मंदा** : तें मी काय सांगूं! मला काय कळतंय ? तुम्हीं पुरुष माणसं, तुम्हाला व्यवहार कळतो, मी अज्ञान असलें तरी तूं तरी सज्ञान आहेस ? तुझ्या बापाचा तुला पाठिंबा आहे. मला कसला आधार आहे ? आईची माया आहे खरी, पण मायेच्या हत्याराला धार असते कुठं ? काय करायचं अशावेळीं ?

**मोती** : ( डोळे मिचकावून हंसून ) मंदा, आपण पळून जाऊं—

**मंदा** : हाच वाटतं तो तुझा उपाय ?—

**मोती** : ऐकलंस—आपण पळून जाऊं. दूर कुठंतरी जाऊं. आपल्याला जिथं कुणी ओळखायचं नाहीं, आपल्या लग्नाच्या आड यायचं नाहीं, अशा कुठंतरी निघून जाऊं.

[ मंदा स्तब्ध रहाते. मोती डोळयांत जीव आणून तिच्या तोंडाकडे पहातो. पण मंदा दूर कुठंतरी पहात राहिली आहे ]

**मोती** : कसला विचार करते आहेस ?

**मंदा** : मी पहातें आहें—

**मोती** : काय पहाते आहेस ?

**मंदा** : तो सूर्य मावळतोय ना—( थांबते )

**मोती** : मावळत्या सूर्याकडे पाहतेयस होय ? पहाच तर—एक तासापूर्वी त्याच्याकडे डोळा लावायची ताकद नव्हती कुणाला. आतां सहज बघतां येतंय ! कां तें माहिती आहे ? तो विचार करतोय. सारी रात्र लपून काढायची आहे या विचारानं कसा फिक्का पडलाय !

**मंदा** : नाहीं ! तो रागावलाय ! सारा दिवस काबाडकष्ट करून घरीं सुखानं जायला मिळालं नाहीं तर कुणाला राग यायचा नाहीं ?

**मोती** : खरं आहे तें ! अशा वेळीं राग येणं साहजिकच आहे—

**मंदा** : रागच कां, चांगली चीड आली पाहिजे. किती सहन करायचं ? कां सहन करायचं ? आई रात्रंदिवस राबते, पण मी कांहींच काम करीत नाहीं. ती मला कामच करूं देत नाहीं मुळीं, म्हणून काकी सारखी धुमसत असते. काकीची सारखी आदळआपट चाललेली असते. माराचा खुराक तर सारखा सुरू आहेच. किती सहन करायचं ? कां सहन करायचं ? कुणासाठीं ? कुणाला सुख आहे यांत ? तुझी युक्तिच बरोबर आहे—आपण पळून जाऊं—

**मोती** : पण आई काय म्हणेल तुझी ?

**मंदा** : आई काय म्हणेल ! एवढं मोठं आयुष्य आहे आपल्यापुढं. आशा आहे आपल्याला पुढची. पण तिचा संसार संपलाय—

**मोती** : तिलाही घेऊन जाऊं बरोबर—

**मंदा** : ती यायची नाहीं. घराचा मोह सुटायचा नाहीं तिला. मला सोडून ती एकटी रहायची नाहीं—अन् तिला सोडून मी नकळत गेलें तर ती जीव सोडील फट्कन् !

**मोती** : मोठा पेंच आलाय हा–कांहींच सुचेनासं झालंय्! (क्षणभर थांबून) असं पहा मंदा–आपण असं करूं–तिला विचारूनच जाऊं कुठंतरी. ती नाहीं म्हणायची नाहीं—

**मंदा** :

**चल जाऊं गोकुळीं। सख्यारे चल**
**जाऊं गोकुळीं ॥ बिकट कठिण पथ**
**सोबत नच कुणि ॥धृ॥ अवघड घरची**
**तोडिन बेडी। म्हणतिल मज मग**
**बावळि वेडी। अपुला परका जरि**
**मज छेडी। त्याचि न लाज मुळीं ॥ १ ॥**

[ तीं दोघेंही एकमेकांच्या सुरांत सूर मिळवून गात असतां गोपाळ येतो. ]

**गोपाळ** : कुठल्या गोकुळांत निघालां आहांत रे पोरांनो ?

**दोघे** : गोपूकाका ? तुम्हांला कशी सांपडली ही जागा ?

**गोपाळ** : नजरच असते माझी तुमच्यावर सारखी. तुमच्या साऱ्या खाणाखुणा माहित आहेत मला. कुठल्या गोकुळांत जायला निघाला आहांत ? गुरांच्या गोठ्यांत सुद्धां जागा मिळायची नाहीं! लंगडींपांगळीं गुरं जिथं ठेवतात त्या गोकुळांत—पांजरपोळांत का जायचंय ?

**मोती** : असं कां म्हणतां गोपूकाका ? अफाट आहे हें जग. इथं कुणाला दयामाया नसली तरी जगांतली दयामाया कांहीं नाहींशी झालेली नाहीं—

**मंदा** : म्हणून जाणार आम्हीं कुठंतरी पळून—

**गोपाळ** : मोती, हें कसलं वेड घातलंयस या बावळ्या पोरीच्या डोक्यांत ? कसं कळत नाहीं तुला ? आपला जन्म गेला या खेड्यांत. जग कुठं आहे, कसं आहे, केवढं आहे, त्याचा पत्तासुद्धां नाहीं आम्हां खेडवळांना. कुठं जाणार ? कुणाच्या आधारावर ?

**मोती** : जाऊं असेच कुठंतरी !

**मंदा** : इथं सारींच ओळखतात, अडचणी आहेत चोहींकडून, म्हणून कुणी धीर देत नाहीं आम्हांला. गेलों इथनं तर भेटेल कुणीतरी मायेचा जीव.

**गोपाळ** : वेड्या पोरांनों, हें जग केवढं अफाट आहे तें माहीत आहे तुम्हाला ? जग तर राहोच–पण आहे हें हिंदुस्थान केवढं मोठं आहे ! या चिमुकल्या खेड्यावरून का जगाची कल्पना करतां ? अशीं सात लाख खडीं आहेत नुसत्या या हिंदुस्थानांत ! नाहीं बरं मोती, हें खेडं हाच आपला आसरा आहे. आपण चिमुकलीं माणसं आहोंत. या चिमुकल्या खेड्यांतच राहिलं पाहिजे आपल्याला. काय सुखदुःख भोगायचं तें इथंच भोगलं पाहिजे. तुटलीक झाली तर मन मारलं पाहिजे. दुःख गिळून सारं कांहीं सहन केलं पाहिजे.

**मोती** : सहन केलं पाहिजे म्हणे ! कुठवर सहन करायचं ?

**गोपाळ** : ज्यांनीं सहन केलंय त्यांना कळतंय तें. सहन करीत गेलास कीं कळेल आपोआप !

**मंदा** : ( खेंकसून ) काय सहन करायचं ? एका थेरड्या-ब्रेरडाशीं लग्न झालं तरी तें सहन करायचं ? कसं कळणार हें ? आपोआप ? असं हें लग्न झालं म्हणजे ? सत्यानाश झाला जन्माचा म्हणजे का अक्कल येते ?

**गोपाळ** : खरं आहे तुझं म्हणणं. सत्यानाश होईपर्यंत थांबून नाहीं चालत. मलाही कळतंय् तें—

**मंदा** : म्हणूनच आम्हीं म्हणतों कीं आम्हीं पळून जाणार !

**गोपाळ** : एवढं मात्र कांहीं करूं नका. मोतीला जातां येईल. तुला जातां यायचं नाहीं. पोलीसांत वर्दी दिली तर तुला पकडून आणतां येईल.

**मोती** : तूं काय ऐकतेस त्यांचं मंदा ? आपलं ठरलं तें ठरलं.

[ ' चल जाऊं गोकुळीं ' हें पद म्हणत मोती मंदेचा हात धरून तिला ओढीत घेऊन जातो. ]

**गोपाळ** : वेडीं पोरं !

[ गोपाळ दुसऱ्या बाजूनें निघून जातो. ]

## प्रवेश तिसरा

[ गांवांतला एक आड रस्ता. पाटील आणि रुपा बोलत बोलत प्रवेश करितात. ]

**रुपा** : असं पहा पाटील, चावडीवर बोलायच्या या गोष्टी नव्हत म्हणून तुम्हांला इथं घेऊन आलों. शिवाला मी इथंच बोलावलंय. त्याला एकदां चांगला पढवला पाहिजे, नाहींतर आयत्या वेळीं घात करायचा तो!

**पाटील** : तें बरोबर आहे. तें मला देखील पटतंय्. पण मी असं म्हणतों,—

**रुपा** : कांहीं म्हणत नाहीं तुम्हीं! समजलं पाटील? मी आहें म्हणून तुम्हीं आहां हें ध्यानांत ठेवा. नाहींतर केव्हांच तुमची ही पाटीलकी गेली असती. हजार वेळां पायां पडावं लागलंय साहेबांपुढं मला तुमच्यासाठीं. तुम्हीं मोठे अक्कलवान आहांत तें मला माहित आहे, पण या बाबतींत माझीच अक्कल घेतली पाहिजे तुम्हांला! समजलं? ( पाहून ) हं थांबा, तो शिवा येतोय. पहा—अगदीं बमालूम बोलायचं त्याच्याकडे—काय? कळलं? ( शिवा येतो ) आलां? तुमचीच वाट पाहत होतों. म्हटलं येतां कीं नाहीं!

**शिवा** : असं कसं होईल? पाटलाचा हुकूम, तो कधीं मोडतां का येतोय?

**पाटील** : ऐकलंस शिवा, मोठा कठिण वखत आहे हा. गांवाची राखण करायचा भार आतां तुझ्यावर आलाय. खरं पाहिलं तर ही सरकारी बाब, पण सरकारांत नेली तर जिवा लोहाराच्या आयुष्याचं मातेरं होईल, म्हणून गांवकीतूनच काय होतं ते पहायला हवं आपल्याला—अन् म्हणूनच ही फिर्याद आली पाहिजे तुझ्याकडून.

**शिवा** : फिर्याद! कसली फिर्याद?

**रुपा** : फिर्याद म्हणजे अशी—तसं पाहिलं तर ही कांहीं सरकारी फिर्याद नाहीं—म्हणजे पाटलाकडे नाहीं आणायची ही फिर्याद—गांव पंचायतीकडे सुद्धां नव्हे—आपल्या जमातीकडे—जातगंगेपुढं आणायची ही फिर्याद! काय पाटील साहेब?

**पाटील** : हो—माझ्याकडे नव्हे कीं ग्रामपंचायतीपुढं नव्हे!

**रुपा** : काय फिर्याद आणाल?

**शिवा :** ( साशंकपणें ) काय फिर्याद आणायची ?

**पाटील :** काय फिर्याद आणायची !

**रुपा :** अशी फिर्याद आणायची, कीं हा जिवा लोहार–काय ? हा जिवा लोहार अधर्मी आहे–( दोघांकडेही एकदां नजर टाकून ते कांहींही बोलत नाहींत असें पाहून ) गोकुळ अष्टमीची मिरवणुक निघाली होती–काय !

**पाटील :** वाः वाः ! काय ती मिरवणूक ! काय ते ढोल नगारे ! ते गोफ, त्या टिपऱ्या, ते लेजिम ! काय ती गर्दी ! वाः वाः अशी मिरवणूक पाहिलीच नव्हती कुणी—

**रुपा :** थांबा पाटील, आधीं माझं ऐका. त्यावेळीं जिवा काय म्हणत होता ? मिरवणुकींत जाऊं नका म्हणून सांगत होता—काय ?

**पाटील :** असं तो सांगतच होता मुळीं—

**रुपा :** ( शिवाला ) कोण सांगत होता ?

**शिवा :** ( घाबरून ) कोण सांगत होता !

**रुपा :** जिवा सांगत होता. तो सांगत होता, कीं पालखींतली बाळकृष्णाची मूर्ति फोडून टाका—

**शिवा :** ( घाबरून ) छेः छेः !

**रुपा :** छे छे काय ? मूर्ति फोडून टाका असंच जिवा सांगत होता. काय पाटीलसाहेब ?

**पाटील :** हं–हं–असंच सांगत होता तो—

**रुपा :** वर्गणी देऊं नका म्हणून सांगत होता—

**शिवा :** छे छे तसं नव्हे–त्यानं वर्गणी दिली नाहीं–देतो कुठली म्हणा—पण वर्गणी देऊं नका असं कांहीं त्यानं सांगितलं नाहीं कुणाला. अन् सांगितलं तरी त्याचं ऐकतो कोण ?

**रुपा :** घरोघर जाऊन सांगत होता. मी ऐकलंय. सर्वांनीं ऐकलंय. गांवच्या महारपोरांनीं ऐकलंय. काय पाटीलसाहेब ?

**पाटील :** हो हो तर ! खुद्द मलाच सांगितलं ना त्यानं !

**शिवा** : नाहीं नाहीं. अगदी खोटं आहे हें. तसा तो धर्मलंड, आहे, स्वतः काय वाटेल तें करील, पण असं करा अन् तसं करा असं कुणाला कधींच सांगत नाहीं तो !

**रुपा** : ऐकलंत ? तो सांगतो. असंच सांगतो. मूर्ति फोडा म्हणून सांगतो. देवाची वर्गणी देऊं नका म्हणून सांगतो. काय पाटीलसाहेब ?

**पाटील** : हो हो तर ! सांगतोच मुळीं—

**रुपा** : तो सांगतो–त्याचा मुलगा सांगतो. अगदीं ठरलंच आहे तें ! बरं, काठी घेऊन मूर्ति फोडायला कोण गेला होता ?

**शिवा** : केव्हां ? कोण गेला होता मूर्ति फोडायला ?

**रुपा** : जयंतीच्या दिवशीं ! रात्रीं बारा वाजतां ! मोती गेला होता ना काठी घेऊन ? काय पाटील साहेब ?

**पाटील** : हो हो तर ! आम्हींच अडवून धरला ना त्याला ! आम्हीं होतों म्हणून, नाहींतर मूर्तीच फोडून टाकली असती त्यानं—

**रुपा** : हा घ्या पुरावा !

**शिवा** : ( अचंबून ) अजबच आहे एकएक ! मी तिथंच होतों जयंतीच्या वेळीं. मी कसं नाहीं पाहिलं ? कुठं बरं होतों मी तेव्हां ?

**रुपा** : कसं नाहीं पाहिलं !

**पाटील** : हो हो तर ! शिवा होताच तिथं. त्यानंच तर मोतीला धरून मागं खेंचलं.

**शिवा** : छे छे, मी मुळींच नव्हतों तिथं. हें काय भलतंच बालंट ! मोतीनं पायसुद्धां ठेवला नव्हता मंडपांत !

**पाटील** : ( ओरडून ) तूं मागं खेचलंस मोतीला ! मी पाहिलं. खोटं बोलतोस माझ्यासमोर ?

**रुपा** : हं ! हं ! पाटील असे तेरीमेरीवर येऊं नका. आतां ऐका,–ऐकलंत शिवबा, कलेक्टरसाहेब माझा दोस्त आहे. आम्हीं बरोबरच होतों शाळेंत— आतां गोरे साहेब नाहींत पूर्वींच्या सारखे—मामलेदार साहेब कसे वागतात

माझ्यापुढं तें पाहिलं आहे ना तुम्हीं ? खांद्यावर हात टाकून चालतात माझ्या ! हे पाटीलसुद्धां दुरून मुजरा करतात त्यांना—असं आहे तें ! तेव्हां काय म्हणत होतों मी—मोतो काठी घेऊन धांवला—

**शिवा :** नाहीं. मी खोटं सांगणार नाहीं !—

**रुपा :** म्हणे खोटं ! खोटं काय अन् खरं काय !—पुराव्यानं ठरेल ते खरं, पुराव्यानं ठरेल तें खोटं. पण पुरावा बळकट पाहिजे—काय पाटीलसाहेब ?

**पाटील :** हो हो, मी पाहिलं ! शिवानं देखील पाहिलं ! मागंच ओढलं ना त्यानं त्याला ?

**शिवा :**काय झालंय मला !

**रुपा :** कांहीं नाहीं झालं ! तेव्हां हें एक नक्की झालं. आतां असं सांगा, मला माहित आहे, आज तुम्हीं अडचणींत आहां. सावकारानं धरणं धरलंय. खरं ना ? पहा, तें सुद्धां मला कळलंय ! किती रुपये पाहिजेत ?

**शिवा :** काय बोलूं मी ! जीव गेला तरी चालेल, पण वाडवडलांची वास्तु परक्याच्या हातीं जाऊं नये म्हणून धडपडतोंय आजवर ! देणं आहे पुष्कळच–पण —पण —[ थांबतो ]

**रुपा :** बोला ना. नुसता तुमचा शब्द. मागाल तेवढे देईन. तारणसुद्धां नको कांहीं. आतां तुमचं आमचं नातं जुळून यायचं. तुमच्यासारख्यांची अब्रू तुमच्या जांवयानं नाहीं राखायची तर राखायची कुणी ? बोला, किती रुपये पाहिजेत ?

**शिवा :** ( ओशाळून ) पन्नास रुपयांसाठीं धरणं धरलंय सावकारानं—

**रुपा :** थांबा–( खिशांतील पाकिट काढून पांच नोटा त्याच्या हातीं देत ) झालं ! आतां कांहीं बोलायचं नाहीं—

**शिवा :** पण पावती केव्हां लिहायची ?

**रुपा :** कसली आली आहे पावती ? देणंघेणं सुरूच आहे की ? एकदमच भरपाई करून घेऊं म्हणजे झालं ! तेव्हां काय पाटील, आतां हें सारं ठाक-ठीक झालं ना ?

**पाटील :** वाः वाः हें काय विचारावं! रुपाजीचा कारभार म्हणजे तिथं तोड नाहीं बरं शिवा, येतों आम्ही—

**रुपा :** बरं का शिवब्रा. आतां विसरायचं नाहीं. नीट ध्यानांत ठेवायचं. येऊं मी?

[ ते दोघेही जातात. हातांतल्या नोटा मोजीत शिवा बावरल्यासारखा उभा आहे. पुन्हां पुन्हां नोटा मोजतो आहे. इतक्यांत गोपाळ येतो. ]

**गोपाळ :** काय शिवब्रा-( शिवा दचकतो आणि नोटा खिशांत घालूं लागतो ) आज लग्गा लागला वाटतं कुठं? कसलं काम मिळालं? कुणाकडचं?

**शिवा :** ( घाबरून ) चाललंच आहे! कामं कुठं आहेत अलीकडे? तरीपण एका माणसानं दिलंय थोडंसं काम मला. थोडं लोखंड आणलं पाहिजे आहे, त्याच्यासाठीं दिले आहेत हे पैसे.

**गोपाळ :** कुणी? रुपाजीनं कीं पाटलानं?

**शिवा :** ( घाबरून ) त्यांच्या मार्फतच मिळालंय हें काम—

**गोपाळ :** मला सांगतोस हें शिवा? काय वाटलं रे तुला? मी दुधखुळा आहें असं तुला वाटलं?

**शिवा :** आतां खरं सांगूं, कर्जाऊ काढलेयत हे पैसे रुपाजीकडून-धरणं धरलंय सावकारानं—

**गोपाळ :** मग बामणाकडे कां नाहीं गेलास?

**शिवा :** आपलीं माणसं असतांना बामणाकडे कां जायचं? त्यांतून बामणाकडे जायचं म्हणजे तारण हवं-तें कुठलं आणूं?—

**गोपाळ :** असं पहा शिवा, हें बरं नव्हे! रुपाला तूं ओळखतोस. माझा दोस्त आहे तो-पण जीव गेला तरी मी त्याच्याकडून कांहीं घ्यायचा नाही. कां माहिती आहे? नाहीं? आवळा घालून कोहळा काढणारा माणूस आहे तो. आज देईल हंसत हंसत, पण उद्यां अशी पकडून धरील मानगुटी—

**शिवा :** माझी कसली मानगुटी धरणार तो! मी त्याच्या बारशाच्या घुगऱ्या खाल्ल्या आहेत!

**गोपाळ :** अन् हें मंदाचं काय?

**शिवा :** कुठल्या मंदाचं ?—हं, हं, म्हणजे आपल्या मंदाचं होय ?—तें आधींच आहे ठरलेलं. गरिबाची पोर, सुखाला तरी लागेल—गडगंज आहे रुगाचं घर. इकडची काडी तिकडे करायला नको—

**गोपाळ :** पण त्याचं वय काय ? तुमच्या आमच्या बरोबरीचाच आहे ना तो ? बाप शोभेल तो मंदाचा. दोन बायका मारल्या त्यानं छळून छळून—शिवाय गांवभर चरतोय तो निराळाच. बाजाराला आलेल्या बायकासुद्धां भीतात त्याला. त्याला देणार तूं मंदा ?

**शिवा :** हें बघ गोपूदादा, आम्हां लोहारांच्या भानगडींत तूं सुतार पडूं नकोस. ती सारी जुनी कुळकथा माहीत आहे मला—अन् तुझा डोळा कुठं आहे, ते सुद्धां माहीत आहे मला. माझा मी समर्थ आहें. मी काय वाटेल तें करीन !

**गोपाळ :** विकणार आहेस पोरीला ?

**शिवा :** मी काय वाटेल तें करीन. जादा बातीचं काम नाहीं. एकदां सांगून ठेवतों, तूं आमच्या भानगडींत पडूं नकोस !

**गोपाळ :** अन् आतां हा कट कसला रे चालला होता ? कसल्या रे गांवकीच्या गोष्टी चालल्या होत्या ?

**शिवा :** आहेंच मी मानकरी गांवचा. गांवकीच्या गोष्टी चालायच्याच माझ्याकडे. काय व्हायचंय् तें दिसून येईलच तुला. पुन्हां सांगून ठेवतों, आमच्या भानगडींत यापुढं तूं पडत जाऊं नकोस !—

[ शिवा तणतणत निघून जातो. गोपाळ पहिल्यानें उगीच थोडासा हंसतो. नंतर खिन्न मुद्रेनें निघून जातो. ]

## प्रवेश चौथा

[ जिवाचं घर. ओटीवर एक दिवा मिणमिणतो आहे. त्याच्या अंधुक प्रकाशांत मंदा गात असल्याचें ऐकूं येतें. मोती येतो. तो दचकून थांबतो. गात गात मंदा पुढें येते. मंदेचें गाणें संपेपर्यंत तो स्तब्धपणें ऐकत असतो. तिचें गाणें संपतांना मोती पुढें येतो. ]

**मंदा :**

> **माझ्या खिडकींत चिमणी आली। आज सकाळीं।**
> **नाजुक झाली बोलि ग। माझ्यासंगं॥**
> **तिनं हळुहळु टिपले दाणं। गाऊं लागली गाणं।**
> **भारीच केविलवाणं ग। माझ्यासंगं॥**
> **तिचि कसलि होति फिर्याद। लागली नाहिं दाद।**
> **उगिच घालि वाद ग। माझ्यासंगं॥**
> **जिवाभावाचा नाहिं तिला कुणी। तीहि गोजिरवाणी।**
> **फुला वेलिंची राणी ग। माझ्यासंगं॥**
> **तिचि चिंवचिंव ऐकूनि कानीं।—**

**मोती :** हें बरं नव्हे मंदा—

**मंदा :** काय बरं नव्हे? गाणं? कां तुलाच गातां येतंय?

**मोती :** मला कुठं गातां येतंय? मी आपला नुसता गुणगुणतों कांहींतरी. तुझा आवाज आहे सुंदर, गातेस देखील छान, पण मी बरं नव्हे म्हणतों, तें हें नव्हे. कशाला आलीस इथं?

**मंदा :** माझ्या मामाच्या घरीं मी येऊं नये?

**मोती :** कोण म्हणतो येऊं नये? पण हें घर कसलं! मसणवट आहे ही! दोघे खविस वावरतात इथं रात्रंदिवस. माणसाच्या जातीला आसरा नव्हे हा. कशाला आलीस इथं?—हा असा काळोख पडलेला—तूं घरीं नाहींस असं पाहिलं कुणी—

**मंदा :** (भट्टीशेजारच्या घडवंचीवर आळसावून बसत) पाहूं दे कुणी तरी! काय करतील? मारतील ना? तो खुराक चाललायच रोजचा. इतका अंगवळणी पडलाय हा मार, कीं एक दिवस चुकला तर जीव कसा खालींवर होतो—उपास पडल्यासारखं वाटतं—

**मोती :** गप्प बैस—

**मंदा :** कां गप्प बैस? आहे तें बोलूं नये?—माझं हें असंच चाललंय, पण आईचा छळ होतोय तें पहावत नाहीं मला. आंतल्याआंत पिचत असते ती.

मी ही अशी बोलतें, सांगून टाकतें, म्हणून मनीचं दुःख हलकं होतं. ती बोलत नाहीं, सांगत नाहीं-सांगणार कुणाला !–एक जिवामामा–पण त्याची कुठं ऐकायची तयारी असते ! कुणाला सांगणार ?

[ ती बोलत असतांना रेणुका येऊन थबकून उभी राहते. मोती आणि मंदा यांचें लक्ष तिच्याकडेस नसतें. रेणुकेच्या मागोमाग जिवा येतो आणि तोही तसाच थबकतो. कुणीच कुणाला पहात नाहीं. रेणुका संथपणें तिच्याकडे जाते. ]

**मंदा** [ तिला पाहातांच ] आलीस ! मला वाटलंच होतं तें ! कशाला माझा असा पाठपुरावा करतेयस !

**रेणुका** : मंदा ! हें काय बोलणं झालं ग ! मी काय पाठपुरावा केला तुझा ! काळोख पडलेला, अजून तूं घरीं आली नाहींस, लसलस करीत नदीवर गेलें, तिथं तूं नाहींस म्हणून इथं आलें–हा पाठपुरावा झाला का ग ? घरीं तूं नाहींस असं पाहिलं तर काय म्हणतील तुझे काका, याचं आहे का तुला कांहीं ? कशाला उगीच मार खातेस अन् मला बघायला लावतेस !

**मंदा** : मग काय करूं तर !

**रेणुका** : वेळच्या वेळीं घरीं येत जा. उगाच त्यांचं तोंड वाजवूं नकोस. तुला कांहीं वाटत नाहीं, पण माझं हें काळीज कसं तुटतं—[ हुंदका आल्यामुळें थांबते. ]

**मोती** : जा पाहूं घरीं मंदे. मी हेंच सांगत होतों तिला आत्या, पण ती काय कुणाचं ऐकायला बसलीय !

**रेणुका** : [ केविलवाणें हंसून ] मग पुढं काय करणार आहेस ! असाच का तिला शिस्तींत ठेवणार आहेस—लग्न झाल्यावर ?

**मंदा** : लग्न झाल्यावर म्हणे ? कुणाशीं लग्न झाल्यावर ? या बावळटाशीं का होणार आहे माझं लग्न !

**मोती** : मी बावळट का ! आतां तूंच पहा आत्या, ही मला बावळट म्हणते. हीच मला बावळट म्हणूं लागली तर लोक काय म्हणतील ! ठीक आहे ! त्या जवानमर्दाशींच झालं पाहिजे तुझं लग्न ! मग कळेल गमंत !

**मंदा :** होणारच तें. तें काय आतां चुकतंय ? काकानीं इतके पैसे घेतलेयत त्याच्याकडून ! गहाण आहे मी आजवर–उद्यां या गहाणाची खरेदी झाली– ( एकदम रडण्याचा हुंदका येऊन मट्कन् घडवंचीवर बसते. इतका वेळ स्वस्थपणें कोंपऱ्यांत उभा राहून पहात असलेला जिवा 'रेणू' म्हणून गंभीरपणें हांक मारतो. त्यासरशीं तीं तिघेंही दचकतात. मंदा घाईघाईनें डोळे पुसून हंसूं लागते. )

**जिवा :** रेणू, या तुझ्या मुलीला घेऊन निघून जा पाहूं इथून अन् पुन्हां केव्हां सुद्धां माझ्या घरांत पाउल टाकूं नकोस ! आतांच तुझा तो दीर भेटला होता–हंः ! कर्जबाजारी झाला कीं माणूस आपली माणूसकी कशी विसरतो याचा चांगला पुरावा दिला त्यानं मला ! मी तरी काय करणार ? तांब्याचा दमडा सुद्धां नाहीं माझ्यापाशीं–गांवांतला माणसान्‌माणूस बघतोय माझ्याकडे डोळे फाडून. सारे माझ्या मरणाची वाट पहाताहेत. मी तुम्हांला काय मदत करणार ?—

**रेणुका :** मी तरी कुठं मागतेंय तुझी मदत ? कुणाची मदत नको मला. माझं दुःख मी भोगतेंय—पण ही पोर अशी अनावर झालीय—

**मंदा :** [ चिडून ] पोर अनावर झाली आहे म्हणे ! तर काय करूं ? घरीं बसून राहूं ? सारखा मार खाऊं ? मामाच्या सुद्धां घरीं यायचं नाहीं मी ? असा काय गुन्हा केलाय मी ? काय कुणाची चोरी केलीय ? कीं जीव घेतलाय ? चोर दरवडेखोर आहे मी, म्हणून मामाच्या सुद्धां घरीं यायचं नाहीं ?

**शिवा :** झालं ? कीं अजून कांहीं बोलायचंय तुला ?–असं पहा मंदा, तूं चोर नाहींस, तूं चोरी केलीस नाहींस, दरवडा घालायची तुझी ताकद नाहीं, खून करण्याइतकं बळ असतं तुझ्या अंगीं, तर या गावांत शिवा आणि रुपा या नांवाचे दोन लोहार कधींच मरून गेले असते ! माझ्या घरींसुद्धां तूं यायचं नाहींस तें एवढ्यासाठींच, तुझी तूं मालक नाहींस ! तुझा पालक आहे दुसरा—तुझी आईसुद्धां तुझी पालक नाहीं, म्हणून तूं इथं यायचं नाहींस. समजलं ? जा आतां—[ एक क्षणभर थांबून ] गेली नाहींस अजून ?

**मंदा :** एकटी कशी जाऊं या काळोखांतून—[ गालांतल्या गालांत हंसते. ]

**रेणुका :** मला बोलायचंय दादाबरोबर—

**मोती :** मी येऊं का हिला पोंचवून ?

**जिवा :** तेंच हवं होतं तुला शेंबडीच्या ! बरं, बरं, जा. पण दुरून घर दाखव आणि परत ये —[ ती जात असतांना ] असं पहा ग पोरी, ती बाहेर एक मोळी पडलीय काटक्यांची, जातांना ती घेऊन जा—[ रेणूका कांहीं बोलते आहे असें पाहून तिला उद्देशून ] तुझ्यावर उपकार करण्यासाठीं नाहीं सांगितलं मी तें ! कारण पाहिजे ना कांहींतरी ? [ मंदेला ] शिवाच्या उरावर नेऊन घाल ती मोळी ! जा पाहू आतां दोघंही—

[ तीं दोघंही गेल्यावर दोघेंही कांहीं वेळ स्तब्ध असतात. थोडासा वेळ गेल्यावर जिवा बोलूं लागतो. ]

**जिवा :** हं ! आतां बोल ! काय बोलायचंय तुला ?

**रेणुका :** पुन्हां पुन्हां आतां काय बोलूं ? बोलायचं तें हजार वेळां बोलून झालंय—[ थांबते ]

**जिवा :** होय ना ? मग जा तर—

**रेणुका :** सावकाराचं धरणं आलं होतं. जप्ती येणार होती घरावर. कुठून यांनीं फट्कन पन्नास रुपये काढले-माझ्या काळजांत धस्स झालं ! मी विचारलं तर मला सांगेनात. कुणाकडून तरी काढले खास-बामणवठारांत कांहीं गेले नव्हते--

**जिवा :** त्यांत काय ! रुपाकडून घेतले त्यानं. काळजांत धस्स कशाला झालं तुझ्या ?

**रेणुका :** म्हणूनच धस्स झालं ! तोच संशय आला मला. असे किती पैसे काढलेयत त्याच्याकडून, देव जाणे ! उद्यां तो पेंचात धरील, टांच आणिल कदाचित् घरावर, अन् मग पोरीच्या जिवाचा सत्यानाश होईल ! घर राखण्या-साठीं पोरीला बळी देईल हा माझा दीर—

**जिवा :** तें तर ठरलंच आहे. त्याला तूं काय करणार आणि मी काय करणार ? मी हा असा रंक कंगाल—असते माझ्याकडे चार पैसे तर तुझ्या ऋणाचा

भार मी काय अजून राहूं दिला असता ? कांहीं उपाय नाहीं ग याला रेणू, कांहीं उपाय नाहीं! मंदा आहे कायद्यानं अज्ञान, तिथंच तर सारं नडलंय! ती सज्ञान होईपर्यंत कसंबसं अडकवून ठेव. याच्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. (मोती येतो) इतक्यांत आलास ?

**मोती** : वाटेंतच भेटला तिचा काका. इकडेच येत होता तो—

**रेणुका** : मग मी जातें तर–खास मार बसला असेल तिला! (तडक जाते)

(जिवा ओटीवरच्या दिव्याला फुंकर घालतो–आणि भट्टीजवळ येऊन बसतो. भट्टीतल्या आगीच्या उजेडामुळं त्याचा चेहरा भेसूर दिसतो.)

**मोती** : एक प्रश्न विचारूं का बाबा ? (जिवा स्तब्ध) विचारूं का एकच प्रश्न ? (जिवा नुसता हुंकार देतो) आम्हीं आतां काय करावं ?

**जिवा** : आम्ही कोण ?

**मोती** : आणखी दुसरीं कोण ? भावाचा मुलगा नि बहिणीची मुलगी ! काय करावं आम्हीं आतां ?

**जिवा** : आधीं स्वतःच्या पायावर उभं राहायला शिकावं! गेल्या ज्येष्ठांत तुला वीस वर्षं पुरीं झालीं. यावेळीं तूं कांहींतरी उद्योगधंदा करायला हवा होतास. मी हा असा थकलेला घोडा, कुणीतरी दाणा-वैरण घातली पाहिजे ना मला ? गांवातल्या भट्ट्या थंड पडत चालल्यायत अन् लकेऱ्या मारीत तूं नुसतां नदीकांठीं हिंडत असतोस! त्यानं काय पोट भरणार आहे ? आतां तुझा तूं मालक झाला आहेस. मी आतां तुझं कांहीं सुद्धां लागत नाहीं. आतां तुझा मार्ग तूंच पहा!—(मोती रागारागानें जाऊन दूर बसतो. जिवा एकदां त्याच्याकडे पाहून घेऊन हळूच हंसतो) रागावलास होय ?

**मोती** : मग काय करूं तर ? आतांच पुन्हां मारलं त्यानं तिला !

**जिवा** : हं !

**मोती** : हं काय ? तिनं असाच मार खात मरावं ?

**जिवा** : त्याला काय उपाय आहे ? सहन केलं पाहिजे. तिची आई नाहीं सहन करीत ? मग तूंच का तळमळतोस ?

**मोती** : तिच्या आईला थोडाच मार बसतोय !

**जिवा** : असं होय ? तुला तरी कोण कुठं मारायला आलंय ?

**मोती** : मनाला दुःख व्हायला काय स्वतः लाच मार बसायला हवा !

**जिवा** : अन् रेणूला नाहीं वाटतं मन ?

**मोती** : बायकांची जात—मन असलं तरी करते काय ?—

**जिवा** : अन् तूं पुरुष माणूस ! मर्दाची जात !—

**मोती** : आतां वीस वर्षं झालीं ना मला ? आतां अक्कल यायची नाहीं तर यायची केव्हां ?-अगदीं बेदम मार आतां दिला त्यानं. तिचा जीव काढतोय तो चांडाळ ! ( जिवा मोठ्यानें हंसतो ) बरं हंसायला सुचतं तुम्हाला ! ही हंसण्यासारखी का गोष्ट आहे ?

**जिवा** : जरा चिलीम भर—

[ मोती धुसपुसत तंबाखूची पिशवी घेऊन उलटी करतो. आंत तंबाखु नाहीं. नुसते डेंख आहेत. ]

**जिवा** : नाहीं वाटतं तंबाखु ?-नाहींतर घाल कसला तरी वाळलेला पाचोळा अन् भर चिलीम. घशाला धूर खपखपला कीं झालं !

[ मोती तंबाखूचे डेंख खुडीत असतो. तो चिलीम भरून तीवर निखारा ठेवून पाठ फिरवून पेटवीपर्यंत जिवा बोलत असतो. ]

**जिवा** : असं पहा मोती, त्या पोरीला इथं आणून काय खायला घालायचं ? एका चिलमीपुरता तंबाखुसुद्धां नाहीं घरांत, तिथं तीन माणसांचं पोट कसं भरणार ? पोटभर का नसेना, पण तिथं घांसभर तरी खायला मिळतंय तिला ? मधून मधून गोपूसुद्धां गोडधोड देत असतोच. हंः ! अन्न पचायला थोडा व्यायाम हवा ! माराचा व्यायाम अन्न पचायला बरा. गांवांतला प्रत्येक बाप आपल्या पोरांना मारतो ! कुणी रागानं मारतो, कुणी लोभानं मारतो. पोरांना मारीत नाहीं तो वडील माणूसच नव्हे असं वाटतंय ना साऱ्यांना ? काम नसलं कांहीं, कीं राग काढावा पोरांवर. मीच काय तो तसं करीत नाहीं. म्हणूनच ना गांवचे लोक मला गाढवांत काढतात ?—

**मोती** : ( पेटवलेली चिलीम फुंकीत ) तिला मारायचा शिवाला काय अधिकार ? कोण आहे तो ? जें कांहीं आहे तें तिच्या बापाचं. तिच्या बापाच्या कमाईवर हा चरतोय. ती कमाई देखील चालली आहे हळूहळू विरघळत ! रेणुका आत्या मरमर मरत असते–घण सुद्धां मारायला लावतो तो तिला—

**जिवा** : दे ना ती चिलीम ! नुसती फुंकीत काय बसला आहेस ? दे पेटवून.
( मोती पुन्हां एकदां पाठ फिरवून चिलीम पेटवून त्याच्या हातीं देत देत बोलतो. )

**मोती** : आम्हीं पळून जायचं ठरवलंय !

**जिवा** : हं ! ( चिलमीचा दम मारीत दर दमाला एक एक वाक्य बोलतो. ) केव्हां जाणार पळून ?–कुठं जाणार ? आणि खाणार काय ?–कवनं ?

**मोती** : भीक मागूं–पण इथं रहाणं नको.

**जिवा** : हो खरंच. गातां येतं दोघांनाही–ही तंबाखुची रिकामी झोळी घेऊन जा जातांना. तेवढी भरली तरी पुरेसे तांदूळ होतील दोघांच्या पोटाला.
( चिलीम त्याच्या हातीं देत ) हं–घे—

**मोती** : नको. ( तणतणत तो दूर जाऊन कोपऱ्यांत धुमसत बसतो )

**जिवा** : मोत्या, इकडे ये. असा उतावीळ होऊं नको. जरा धीर धर. सोळा वर्षं पुरीं होऊं देत तिला. कितीही मार बसला तरी तोपर्यंत ती खास मरत नाहीं–तशी पिंडानं चांगली मजबूत आहे ती !

**मोती** : तुम्हाला काळीजच नाहीं ! ( रागारागानें तो ओटीवर जाऊन बसतो. गोपाळ येतो. )

**जिवा** : ऐकलंस गोप्या, हा पोर म्हणतो माझा, कीं मला काळीज नाहीं. तुला वाटतं असं ?

**गोपाळ** : लोक म्हणतात ना तसं ? लोक म्हणतात, तो ऐकतो अन् तोही मग तसंच म्हणतो. कायरे मोती, असंच ना ?

**जिवा** : रातच्या पारीं कुठं निघालास ? बैस ना–( त्याच्या हातीं चिलीम देत ) पहा हं, आधींच डेंख टाकले होते त्या चिलमींत. तंबाखू राह्यलाच नसेल मुळीं—

**गोपाळ :** ( चिलमीची साफी खालीं टाकून धोतराची साफी करून झुरका मारीत ) झालीं जेवणं ?

**जिवा :** आज एकादशी आहे—

**गोपाळ :** आज एकादशी ? कुठल्या पंचांगातली एकादशी रे ही ?–अन् तूं केंव्हांपासून एकादशी पाळूं लागलास ?

**जिवा :** धंदा बसल्यापासून. ही एकादशी पंचांगातली नव्हे, प्रळयांतली एकादशी आहे ही ! रोज एकादशी ! रोज शिवरात्र ! मुसलमानांचे रोजेसुद्धां पाळतों आतां !

**गोपाळ :** कुठल्या देवानं घडवलं रे तुला ?

**जिवा :** देवानं नाहीं—माणसानं ! कुठल्याशा दोन माणसांचे खेळ झाले त्याचा हा परिणाम ! देवाला कशाला घालतां या भानगडींत !

**गोपाळ :** तूं काय म्हणशील तें खरें ! तुझ्यापुढं बोलायची सोयच नाहीं मुळीं–

**जिवा :** बरं ! हें कळलं का तुला, हा माझा मुलगा पळून जाणार आहे म्हणे ! एकटा नाहीं ( खुणेनें दाखवीत ) बरोबर घेऊन—

**मोती :** मी जातोंच कसा—( घरांत जातो )

**जिवा :** पाहिलंस ? पोराला राग आला !—अरे ! ती घोंगडी घे पांघरायला. थंडी आहे ना बाहेर ?

**मोती :** ( आंतून ) बरं बरं–कळली तुमची माया !

**जिवा :** असं आहे ! कुणाला दया दाखवायची सोय नाहीं. त्याला वाटतं गोपाळ, मी त्याची काळजी घेत नाहीं. त्याला वाटतं, या माझ्या एकादशीच्या छत्राखालीं व्रतवैकल्यं करायला एकादी सून आणली पाहिजे घरांत. मी म्हणतों, आमच्या एकादशा चालल्याच आहेत, त्यांत आणखी पोरींसोरींच्या हरताळका नकोत !—कां आला होतास असा रात्रीं ?

**गोपाळ :** मुद्दामच आलों यावेळीं. भर दिवसा तुझ्या घरीं येणं शक्य नाहीं मला. रुपाचा दोस्त आहें ना मी !—एक कट चाललाय !

**जिवा :** काळोखांतले मारे मला सांगूं नकोस !

**गोपाळ** : हा काळोखांतला मारा नव्हे. अगदीं उघड हल्ला होणार आहे हा !—तुला वाळींत टाकणार आहेत—( जिवा मोठमोठ्यानें हंसतो ) हंसतोस काय! वाळींत टाकणं म्हणजे काय याची कल्पना आहे का तुला ?

**जिवा** : कल्पना कशाला हवी ? आज कुठं मी जातींत आहें ? काय मी तुमच्या देवधर्मांत आहे ? कीं लग्न कार्यांत आहें ? कीं कुणाला खांदा द्यायला मला कोण बोलवतंय ? माझ्या या मसणवट झालेल्या घरांत तरी कोण येतंय ? मला कसला वाळींत टाकणार आहांत शेंबडीच्यानों ?–कशाला आलास उगीच ( गोपाळ चिलीम त्याच्या हातीं पुन्हां देतो. बोलत असतांना तो दम मारून धूर येत नाहीं असें पाहून चिलीम उपडी करून खडा आणि साफी आंत टांकून बाजूला ठेवतो. हें सर्व बोलत असतांना होत असतें. ) मला काय हें माहीत नाहीं ? हजार डोळ्यांनीं पहातोंय मी. माझे आई, माझं ऐक. कुणाला विरोध करूं नकोस. विरोधानं चीड वाढते. नुसता हो ला हो देत जा, त्यांच्यांत मिसळ, त्यांच्यासारखाच बोल, समजलास ? मी आंधळा नाहीं. सारं कांहीं पहातोंय मी. हें बघ गोपू, जगाचे व्यवहार मोठे विलक्षण असतात, तसंच विलक्षण वागलं पाहिजे आपण, तरच निभाव लागतो—( तो उठून उभा रहातो ) जा आतां !

**गोपाळ** : ( त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ) म्हणूनच तुला सारे डरतात रे ते ! ( गाहिंवरून ) तूं म्हणजे एक कोडं आहेस जिवा !

[ अधिक न बोलतां संथपणें निघून जातो. जिवा आपल्याशींच हंसत खालीं बसतो. चिमट्यानं भट्टी उसकटतो. त्यांत आतां एकच निखारा राहिला आहे, तो चिमट्यानं उचलून पहातो. तसाच पहात रहातो. पडदा पडतो. ]

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

[ देवळापुढील पटांगण. जमलेले लोक 'एकवचन, एक बाण, रामाची आण' असें ओरडत जातात. शिवा आणि पाटील मागें रहातात. ]

**पाटील** : [ शिवाची पाठ थोपटून ] शाबास शिवबा, आज अगदीं तरवार मारलीत ! फार भीती वाटत होती मला, कीं पंचांसमोर बोलतांना पट्कन घात कराल. पण एकंदरींत ठीक झालं.

**शिवा** : [ केविलवाणें हंसायचा प्रयत्न करीत ] तसा मी कांहीं अगदींच हा नाहीं—तरी पण मन जरा मागंपुढं होत होतं—

**पाटील** : असं मागंपुढं करून कसं चालेल शिवबा ? हें गांवकीचं काम आहे-सरकार दरबारापेक्षां देखील गांवकीचा जोरा केवढा मोठा असतो तें दिसलं ना आतांच ? वाळींत टाकला ना जिव्याला ? आतां तुमच्या मार्गांतला कांटा दूर झाला.

**शिवा** : [ चांचरत ] हो, झालंय खरं तसं. पण तें असं आहे—

**पाटील** : आतां पण बीण कांहीं नाहीं. झालं तें सारं ठीक झालं. जिवा लोहार जातीबाहेर पडला—तो अन् त्याचा पोर दोघेही आतां गेले जातीबाहेर.

**शिवा** : हो !

**पाटील** : हो काय ? आतां तें होऊन गेलंय. तसं म्हटलं तर मी कांहीं तुमच्या जातीचा नाहीं. तुमच्या जातगंगेच्या सभेला हजर राहिलों, तो तुम्हीं आयत्यावेळीं घाण कराल म्हणून. आता सारं ठीक झालं. आतां कसला मुद्दां किंतु मनांत ठेवायचा नाहीं. समजलं ? जाऊं मी आतां ? ( जातो )

**शिवा** : ( शिवा देवळाच्या पायरीसमोर जाऊन नमस्कार करतो ) देवा—तूं सारं जाणतोस—मी कांहीं केलं नाहीं—तुझं नांव घेऊन खोटं बोललों—पण या पापाचा धनी रुपा लोहार. तूं जाणतोस देवा, त्यानं माझा गळा धरलाय. त्यानं सांगितलं—मी बोललों. वाचा त्याची, जीभ

माझी. मी पाप केलं देवा–पण या पापाचा धनी कोण, तें देवा तुझा तूंच पाहून घे. क्षमा करणं तुझ्या हातीं आहे देवा! ( शिवा पुन्हां जमिनीवर डोकें टेकून क्षणभर तसाच राहातो. बाजूनें जिवा येतो आणि त्याच्यासमोर उभा राहतो. शिवा डोकें वर करतो आणि समोर जिवा दिसतांच ताड्कन उठून बाजूला होतो. )

**जिवा :** झालं तुझं समाधान?

**शिवा :** आला होतास ना? मग कां बाजूला राहिलास? कां आला नाहींस थोरांसमोर?

**जिवा :** ( गालांतल्या गालांत हंसत ) शिवा! काय केलंस हें! खोटं बोललास? तूं देव मानतोस–होय ना? देव सर्वत्र आहे असं तूं म्हणतोस. तूं काय केलंस तें कळणार नाहीं का तुझ्या देवाला? माणूस सर्वज्ञ नाहीं, त्याला फसवशील, तुझ्या देवाला तूं कसा फसवशील?

**शिवा :** तुला काय होय देव? तूं कशाला देतोस देवाचा निर्वाळा?

**जिवा :** मी नाहीं रे देत देवाचा निर्वाळा. पण तुझ्या लेखीं देव सर्वज्ञ आहे. माणसाजवळ कुठं आपण कबूली देतों? पुराव्यानं गुन्हां पदरांत घातला तरी-सुद्धां बालंट घेतलं आपल्यावर, असं बेछूट म्हणतों. तूं तसंच बोललास. माझ्यावर बालंट घेतलंस, माणसासमोर बालंट घेतलंस—पण तुझ्या देवाला काय उत्तर देशील?

**शिवा :** देवानं बुद्धि दिली तसं मी बोललों. कर्ता करविता तो. बुद्धिदाता तो. त्यानंच मला बुद्धि दिली! मी खोटी फिर्याद दिली—पण तीं देवानं बुद्धि दिली म्हणून—

**जिवा :** असं होय? शिवा, तुला बुद्धि दिली ती देवानं नाहीं—एका माणसानं दिली—रुप्या लोहारानं तुला बुद्धि दिली, तेव्हां तुझ्या अंतरींच्या देवानं काय सांगितलं तुला? ( शिवा स्तब्ध ) तो अंतरांतून बोलतो, तोच देव असतो शिवा! देव देवळांत नसतो! देव कुठं असलाच तर तो माणसाच्या काळजांत असतो. त्या काळजाच्या देवळांतल्या देवानं खोटी फिर्याद देतांना काय सांगितलं तुला? ( थांबून ) असं खोटं बोलूं नकोस म्हणून नाहीं सांगितलं?

मान कशाला खालीं घालतेस ? खोटं बोल म्हणाला तो जर देव, तर खोटं बोलूं नको म्हणत होता तो कोण ?—शिवा, केवढं खोटं काम केलंस हें ? काय मिळवलंस यांतून ? जन्मभर हें डांचत राहील तुझ्या जिवाला ! अरे मला कसला वाळींत टाकतां ? मी मिसळतच नाहीं तुमच्यांत. जिथं मी तुमच्यांत नाहींच मुळीं, तिथं तुमच्या जातीबाहेर कसला टाकतां मला ?

**शिवा :** ( उसन्या अवसानानें ) बरं-बरं-कळली तुझी अक्कल ! कांहीं झालं तरी आतां माझी पुतणी कांहीं तुझ्या घरीं पडत नाहीं—

**जिवा :** एवढंच होय ? एवढ्यासाठींच हे एवढे उपद्व्याप केलेस ? सरळ सरळ मला कां नाहीं सांगितलंस तसं ? मी काय तुझ्या मागं लागलों होतों ? तुझी पुतणी माझ्या पोराला दे असं म्हटलं होतं ? मरतांना तुझ्या भावानं तुला सांगितलं-तुझ्याकडून आणभाक घेतली-हें जग सोडून जाणाऱ्या त्या तुझ्या भावाच्या हातावर हात देऊन तूं वचन दिलंस ! तें तूं विसरलास-मी विसरलों नाहीं. तूं विसरला असलास तरी ती आठवण तुझ्या काळजांत जागी आहे म्हणूनच तूं एवढे उपद्व्याप केलेस. रुप्याच्या नादीं लागून देवाच्या साक्षीनं खोटं बोललास ! देव कुठं असला तर तो तुला क्षमा करो. ( जातो )

**शिवा :** ( पुन्हां जमिनीवर डोकें टेकून वर पाहून हात जोडून ) देवा मला क्षमा कर ! मला सद्बुद्धि दे !—( पडदा )

## प्रवेश २ रा

[ गांवाबाहेरची एक जंगली जागा. लांकडांच्या काटक्या गोळा करीत रेणुका आणि मंदा येत आहेत. मंदा आपल्याशींच गात आहे. गात असतांना ती हातांतल्या काटक्या खालीं ठेवून ओंच्यांत गोळा केलेलीं फुले गातगात आपल्या माथ्यांत माळीत आहे ]

**रेणुका :** मंदे, आधीं हातचं काम उरकून घे पाहूं. उशीर झाला तर घरचीं माणसं घरीं ओरडतील ना ? तूं ही अशी उनाडतेस अन् मग बोलणीं ऐकून घ्यावीं लागतात मला—

[ मंदा तिचें न ऐकतां सारखी गात आहे आणि भराभर फुलें बुचड्यांत खोऊन घेत आहे ]

**रेणुका :** तीं डोक्यांतलीं फुलं काढून टाक पाहूं मंदा—( ती ऐकत नाहीं असें पाहून, गोळा केलेल्या काटक्या तशाच टाकून रेणुका धांवत जाते आणि तिच्या डोक्यांतलीं फुलें काढून फेकून देऊं लागते. तोंच रुपा येतो. )

**रुपा :** राहूं देत तीं फुलं—असं काय करतां ? पोरवय आहे,–या वयांत फुलं माळायचीं नाहींत तर काय उद्यां केंस पिकल्यावर ?– राहूं देत तीं. बरीं दिसतात तिच्या डोईंत !-( मंदा डोक्यांतलीं फुलें काढून भराभर फेकून देते. रुपा एकदोन फुलें उचलून मंदेच्या बुचड्यांत खोऊं लागतो, त्यासरशीं ती त्याच्या हातावर सडकून चापटी मारते. )

**रेणुका :** ( ओरडून ) अग, अग, हें काय !
( मंदा खाली पडलेलीं फुलें पायाखालीं तुडवते )

**रुपा :** ( हंसत हंसत हात चोळीत ) अरे, अरे, हें काय ? राहूं देत कीं !– आतां बाजारांत जाऊन आयत्या वेण्याच घेऊन पाठवून देतों.

( त्याचें बोलणें कानावर न घेतां रेणूका आणि मंदा काटक्या गोळा करून भारी बांधूं लागतात. रुपा मंदेला मदत करायला धांवतो. ती त्याला लोटून देते. तो हसूं लागतो. ती दूर जाऊन उभी राहते. )

**रुपा :** काय हें रेणुकाबाई, असल्या या नाजुक पोरीला हीं कसलीं कामं सांगतां ! काय झालं त्या शिवाच्या बायकोला ? मरेल का ती तुमच्या मदतीला आली तर ! एकंदरींत तिला घमेंडच फार ! ( रेणुकेनें बांधलेली काटक्यांची मोळी तिनें मंदेच्या डोक्यावर चढवतांच ) हें काय ! हें काय ? एवढं हें ओझें हिच्या डोईवर का द्यायचं ? कांहीं माणुसकी आहे का तुम्हांला ? अन् ही आई !—( मंदेला ) ही तुझी आई बरं ! गांवच्या महारणीसारखी तुझ्या डोक्यांवर मोळी चढवते ! ही तुझी आई !

**रेणुका :** मंदे, टाक ती मोळी खालीं. मी नेईन घरीं. तूं आतां जा पाहूं इथून—

[ आईचें न ऐकतां मंदा वल्ह्यासारखे हात फलकावीत मोळी घेऊन जाऊं लागते ]

**रुपा** : वाः वाः ! काय ही चाल ! एवढ्यासाठीं तरी मोळी डोक्यावर द्यावीशी वाटते हिच्या !—

[ मंदा डोक्यावरची मोळी टाकून गातगात निघून जाते. रेणुका तिनें टाकलेली मोळी पुन्हां नीट बांधू लागते. ]

**रुपा** : कामधाम करणं कांहीं वाईट नाहीं—पण ही गायची खोड बरी नव्हे. घरगुती बायकांनीं कधीं गाऊं नये—

**रेणुका** : ( खालीं बसून मोळी बांधीत ) पोर आहे ती ! अजून कांहीं बायकांत जमा नाहीं !

**रुपा** : पण आमच्या घरीं हें असलं चालायचं नाहीं—

**रेणुका** : आहे आमच्या घरीं तोंवर गाईल, पुढं तिचं नशीब आणि ती—

**रुपा** : हें वय का आहे तिचं कष्ट करायचं ? किती काळवंडलीय ! मला असलं कांहीं खपायचं नाहीं. उन्हातानांतून मुळींच फिरकूं देऊं नका तिला. कळलं ? आतां दीड दोन महिन्यांची बात्र आहे—पहिल्याच मुहूर्तावर— ( रेणुका मोठमोठ्यानें हसते ) कां ? हंसलांतशा ? असं काय हंसण्याजोगं बोललों मी ?

**रेणुका** : नाहीं म्हटलं, अजून कुठं झालंय तिचं लग्नाचं वय ?

**रुपा** : खरं आहे-खरं आहे ! तुम्हांला तसं वाटायचंच ! आईची नजर ना ? पण जगाला डोळे आहेत. जगाला दिसतं ना माणसाचं वय ? या वयांत माझ्या पहिल्या बायकोला एक मूल होऊन ती दुसऱ्यांदा पोटाशी राहिली होती—( रेणुका हंसते ) हसतां कां ? मी अगदीं खरंखरं सांगतोंय. असं हंसण्यावारी नेऊं नका. आतां हें लग्न उरकल्यावर तुम्हींसुद्धां या आमच्या इकडेसच राहायला-तिची काळजी घ्यायला हवं ना कुणी ?

**रेणुका** : माझं घर कसंही असलं तरी तें मला रामाच्या अयोध्येसारखं आहे-

**रुपा** : तेवढं गाऊं देऊं नका तिला-गांवात फार थट्टा होते त्यामुळं—

**रेणुका** : तिला गाणं आवडतं—मला गाणं आवडतं—

**रुपा** : अन् मलासुद्धां गाणं आवडतं—पण असं गाणं म्हणत हिंडणं नाहीं मला आवडत—

**रेणुका** : नसलं आवडत तर ऐकूं नका—

**रुपा** : असं म्हणून कसं चालेल ?–आतां ती माझी होणार—

**रेणुका** : फुलाबोलाला गांठ पडायला अजून खूप वेळ आहे—

**रुपा** : नाहीं–आतां तें अगदीं ठरून गेलंय. त्यांत बदल व्हायचा नाहीं.

**रेणुका** : ( मोळी बांधायचें तेवढेंच टाकून ताड्‌कन उठून ) ऐकलंत रुपाजी-राव, तुम्हीं परभारें कट करून ठरवलं तरी मुलगी माझी आहे. मुरळी म्हणून वाहीन खंडोबाला पण तुम्हांला नाहीं द्यायची ! कशाला हो हवं तुम्हाला लग्न ? चाललेयत ढंग ते चालूंद्यात तसेच ! कुणी नको म्हणत नाहीं तुम्हांला. माझ्या मुलीचा गळा कशाला कापतां ? माझी मुलगी कांहीं भारी नाहीं. मला तसंच कांहीं संकट आलं तर दगड बांधून घेऊन दोघीही नदींत जीव देऊं–समजलं ! ( मोळी तशीच टाकून निघून जाते. रुपाही हंसत हंसत जातो. दुसऱ्या बाजूनें मंदा येऊन मोळी बांधूं लागते. तिच्या मागोमाग मोती येत असतो. ती मोळी घेऊन डोक्यावर चढवते आणि उभी रहाते, तोंच तिची नजर मोतीकडे जाते, तशी मोळी घेऊन ती पळूं लागते. मोती पाठलाग करतो. ती अडखळून मोळीसकट पडते. मोळीची ठोकर लागून तोही पडतो )

**मंदा** : गबाळया !—बावळट कुठला !

**मोती** : आहेच मुळीं ! रूबाबांत कसं वागायचं तें आतां शिकव ना मला. ( उभा राहातो. मंदा मोळींतली एक काटकी घेऊन हातांत खेळवीत असते )

**मंदा** : ( वर पहात ) तो त्याचा कोट—ती त्याची टोपी—ती त्याची रुपेरी मुठीची छडी–तो कलप लावलेल्या मिशीचा आंकडा–ती हलणारी भिवई–तें नाजूक हंसणं—

**मोती** : कुणाचं हंसणं ?

**मंदा** : ( लाजत मुरकत ) माझ्या नवऱ्याचं—

**मोती** : तुझा नवरा ? हा आणखीन् कुठला आला तुझा नवरा ?

**मंदा** : ( जीभ आडवी टाकून लाडीकपणानें डोळे मुरडीत ) माझा दादला !

**मोती** : कुठला दादला ?

**मंदा** : ( ताड्‌कन उठून ) तुझ्यासारखा गबाळया नाहीं तो !—किती माया

करतो माझी !—फुलं घालतो माझ्या डोईंत! मोळी वाहूं नको म्हणतो! मी मोळी वाहिली तर माझ्या आईला रागं भरतो! आईला कुठं कधीं माया असते! दादला ना तो माझा, म्हणून एवढी माया!—उन्हांत जाऊं नकोस म्हणतो! मी काळवंडलेंय हें त्याला कळतं—आईला कळत नाहीं माझ्या! असा आहे माझा दादला—

**माझा दादला ग बाई दादला। माझ्या पूर्वीच्या**
**पुण्याईनं लाधला ॥ धृ ॥ याची मर्दांची जात।**
**मारी अस्तनीवर बात। करतो नसती यातायात।**
**याचा कारभार गांवाला बाधला ॥ १ ॥**

**मोती** : ( ती गात असतांना ओरडतो ) गप्प बैस !—गप्प बैस ! !—गप्प बैस ! ! ! (ती जोराजोरानें गाते ) गप्प बैस म्हणतों ना ?–असल्या तमाशांतल्या छकडी नाहीं मला आवडत—

**मंदा** : पण मला आवडतात ! माझ्या दादल्याला आवडतात ! मग भोति आहे का मला कुणाची ?

**मोती** : कुठला आणला आहेस हा दादला ?

**मंदा** : आतां हा कुठला महिना बरं ? ( बोटें घालीत ) भाद्वा–आश्विन—कार्तिक–मार्गेसर—कुठल्या महिन्यांत असतात बरं लग्नं ?—

**मोती** : आतां पहा हं, मी चिडून निघून जाईन इथनं !

**मंदा** : गेलास तर तुटलं माझं खेटर ! जा ना. आतां कोण पर्वा करतंय तुझी ? दोन मजली घर आहे माझं–चिरेबंदी ! मी बसलेली असेन माडींतल्या खिडकींत–नि तूं बघशील अश्शी वर मान करून–कशी ?–कशी ?–अश्शी !–अन् मी अशी मान फिरवीन नि घरांत जाईन ! काय ?–अन् मग माझा दादला येईल–अन् धक्के मारून तुला घालवून देईल !—अन् मग मला काय वाटेल त्यावेळीं ? सांग ना—काय करीन मी ?

**मोती** : रडशील !

**मंदा** : रडतंय माझं खेंटर !

**मोती** : हें पहा मंदे, असं भलभलतंच बोलशील तर अशी हाणीन चपराक—

**मंदा** : चपराकीचं भय मला दाखवतोस ? मला ! जन्मभर चपराकीच्याच खुराकावर वाढलेंय मीं. चपराकीला भीतेंय मी ? मला भय वाटलं असतं—पण तें कसलं ?—

**मोती** : कसलं ?

**मंदा** : कुणी गोड बोललं–कुणी कुरवाळलं–कुणी हंसवलं–कुणी रुसवलं–पण कोण आहे तसं करणारं ? आई तर स्वतःच रडत असते. मायेनं क्षणभर कधीं तिनं मला जवळ घेतलं तर तेंसुद्धां कुणाला बघवत नाहीं. डोळे फुटतात सर्वांचे. ( बोलत बोलत तीं हंसूं लागते. तिचें हंसें अनावर होतें ) अन् आतां माझं लगीन होणार ! ( तेंच वाक्य पुन्हां पुन्हां उच्चारून हंसता हसतां तिला रडूं कोसळतें. मोती तिचे डोळे पुसायचा प्रयत्न करतो, तेव्हां ती त्याच्या हातावर चापटी मारते. मोती एकदम दूर जातो )

**मंदा** : ( रडूं आवरण्याचा प्रयत्न करीत ) रागावलास मोती ! आतां तूंच सांग, तूंच असा रागावूं लागलास तर मी कुणाच्या तोंडाकडे पाहूं ? काय होणार माझं ? सांग ना–आतां माझं काय होणार ?

( मोती खालीं बसतो. तीही जाऊन त्याच्याजवळ खेटून बसते. )

**मंदा** : बोलत कां नाहींस मोती ? कसं कैचींत धरलंय मेल्यानं ! अन् तूं हा असा ! धंदा नाहीं उदीम नाहीं–कवनं करीत बसतोस नुसता. तसाच तो जिवामामा–नुसता देवाला गाळी देत असतो. गाळी देऊन का देव वठणीवर येणार आहे. माणसानींच सोडली आमची काळजी–( आंतून दुरून रुपाचा दरडावणीचा आवाज–' मोत्या ! मोत्या, दूर हो.' तो आवाज ऐकून दोघेहीं एकमेकांना जास्त खेटून बसतात. रूपा येतो आणि मोत्याच्या बखोटीला धरून त्याला खेंचतो. )

**रुपा** : कुणाला खेटून बसला होतास ?

**मंदा** : ( मोठ्यानें ओरडून ) इकडे ये मोती !

**रुपा** : बोल–कुणाशीं लगट करीत होतीस ?

[ कांहींसुद्धां न बोलतां मोती रुपाला एक ठोसा लगावतो. रुपा अचानक हल्लयामुळं कोसळणार होता पण सांवरून मोतीच्या अंगावर तुटून पडतो. दोघांचीही चांगलीच जुंपते. मोती चिरडीनें रुप्याला तडाख्यावर तडाखे लगावीत असतो. मंदा 'दे ठोसा–मार सडकून' असें म्हणत टाळया पिटून हंसत असते. शेवटीं रुपा थकून खालीं पडतो. तो उठायचा प्रयत्न करीत असतांना मोती त्याच्या कंबरेंत लाथ मारतो. मंदा रुपाजवळ जाते. ]

**मंदा :** हळू उठा हं! भारीच बाई हा वाईट मोत्या. माणूस—सुमाणूस कांहींच कळत नाहीं याला. वडील माणसांच्या आंगावर असा हात टाकायचा म्हणजे काय? आंग दुखतंय् होय? दुखायचंच तें! कुणी तरी रगडलं पाहिजे अशा वेळीं. अन् रगडणारं माणूस तर घरांत नाहीं. आतां आमच्या काकांना सांगा, त्यांना चांगलं रगडतां येतं. रोज रगडतात ते माझी पाठ!

( ती हंसत हंसत अन् टिवल्याबावल्या करीत बोलत असते. रुपाला उठतां येत नाहीं. तो नुसता गुरगुरत असतो. मंदा 'दादला ग बाई दादला' हें पद म्हणत चुटक्या वाजवीत नाचूं लागते. रुपा कसाबसा उठून बसतो आणि धडपडत जाऊं लागतो. )

**रुपा :** याद राखुन ठेव मोत्या–आतां तुरुंगांतच डांबतो तुला थूकमारीच्या! ( धडपडत जातो. तो जात असतांना तीं दोघेंहीं कांहींवेळ पहात असतात. )

**मंदा :** ( घाबरून ) खरोखरच तो फिर्याद नाहीं ना करायचा? त्याचं वजन आहे म्हणे सरकारांत. चांगलाच मार मिळालाय! चांगलीच शिक्षा व्हायची तुला कदाचित्!

**मोती :** ( आंग झाडीत ) होइना का शिक्षा–तुरुंगांत ठेवलं तर पोटभर जेवायला तरी मिळेल!

**मंदा :** पण जेवायला कोण करून घालील जिवामामाला?

**मोती :** हो–हो–तेंही खरंच।

**मंदा :** असं आहे तुम्हां पुरुषांचं! पुढला विचार नाहीं करीत तुम्हीं पुरुष-लोक!—

**मोती** : मग तेव्हांच कां नाहीं मला मागं खेंचलंस ?

**मंदा** : तेव्हां तूं थोडाच ऐकणार होतास ? रक्त चढलं होतं ना तुझ्या डोक्यांत ?

**मोती** : अन् तूं नाचलीस ती !–नाचलीस काय, चुटक्या वाजवल्यास काय, अन् छकडा काय म्हटल्यास ! तेव्हां कुठं गेली होती तुझी अक्कल ? माझ्या मारापेक्षां तुझ्या नाचाचीच अधिक चीड आली त्याला ! अन् म्हणे पुरुषांना पोंच नाहीं !

**मंदा** : चूक झाली खरी. पोरच नाहीं का मी ! तूं हा एवढा मोठा माणूस, तुला कळलं पाहिजे होतं—

**मोती** : मला नाहीं कांहीं त्याचं वाटत. बाबांना देखील थोडी अद्दल घडलीच पाहिजे. रोज जेवण करायला लावतात मला. मी काय बायकोमाणूस आहें ? एक दिवसाचा देखील विसावा मिळत नाहीं. तुमचं आपलं बरं, महिन्यांतून तीन दिवस सुट्टी. मत्सर वाटतो मला तुम्हां बायकांचा !

**मंदा** : हासुद्धां मत्सर वाटतो ना ? जिवामामा तुला बायक्या म्हणतो तें कांहीं खोटं नाहीं !

**मोती** : म्हणूनच आज मर्दाई दाखवावी लागली मला. आतां मी गेलों तुरुंगांत, रोज जेवण करावं लागलं, मग कळेल माझ्या बायकीपणाचा प्रताप ! शिक्षाच झाली पाहिजे मला, त्याशिवाय नाहीं बाबांचे डोळे उघडायचे !

**मंदा** : आतां तूं जा आपल्या घरीं. उगीच नको कुणी पाहायला !

**मोती** : तूंही त्यांतलीच ! सगळेच भीतात त्या रुप्याला. आतां तरी कळेल लोकांना कीं रुप्याला भीत नाहीं असा एकतरी मर्द आहे या गांवांत ! आतां घाला म्हणावं तुरुंगांत ! मी नाहीं भीत !

[ तो बोलत असतांना ती भारी उचलायचा प्रयत्न करते. तो तिला बोलत बोलत हात देतो आणि ती कांहीं न बोलतां भारी घेऊन जाते. ]

**मोती** : ( क्षणभर विचार करून, मानेला झटका देऊन ) ज्या बे रुपा लोहार ! ( जातो. )

## प्रवेश तिसरा

[गांवचा एक रस्ता, गोपाळ सुतार इकडे तिकडे बघत येत असतो, इतक्यांत समोरून रुपा लोहार येतो.]

**गोपाळ :** आं! काय झालं रुपाजीराव?

**रुपा :** काय झालं? जीव घेणार होतों त्याचा, पण काय करूं रे! अहिंसाव्रत पत्करलंय मी!

**गोपाळ :** काय केलं कुणी?

**रुपा :** मारलं मला—बडवलं–तुडवलं–कुंभार मातीं तुडवतात तसं तुडवलं!

**गोपाळ :** कां तुडवलं? कुणी तुडवलं?

**रुपा :** कुणी तुडवलं म्हणे! जिवाच्या पोरानं तुडवलं!

**गोपाळ :** जिवाच्या पोरानं? अन् तुम्हांला तुडवलं? कां?

**रुपा :** हो–हो—जिवाच्या पोरानं! कां तुडवलं? ते त्यालाच विचार. त्या रेणुकेला विचार. तिच्या पोरीला विचार. पाहतोस काय तोंड वासून? मी हात नाहीं उगारला वर–सारखा मारीत होता, पण हातसुद्धां लोटला नाहीं त्याचा! मार म्हटलं–मारायचं तितकं मार म्हटलं–पण उलटून मारलं नाहीं त्याला! काय माझ्या मनगटांत जोर नव्हता? काय माझ्या अंगांत ताकद नव्हती? अस्सा चिरडला असता तर मरून गेला असता ढेकणासारखा—जिवा लोहाराच्या पाण्याचा आधार तुटला असता. पण मी हात उचलला नाहीं! शुकूसुद्धां केलं नाहीं!

**गोपाळ :** पण कां मारलं त्यानं?

**रुपा :** तें त्या कारटीला विचार! तिच्यादेखत मारलं. टाळ्या पिटीत होती ती! ऐकलंस? मला मोत्यानं मारलं म्हणून तीं कार्टी टाळ्या पिटीत होती. आता पहा म्हणावं गम्मत!

**गोपाळ :** जिव्याला आज वाळींत टाकलं म्हणे!

**रुपा :** जिवा गेला गाढवाच्या गोणींत! आतां आधीं त्या मोत्याची काय गम्मत करतों तें तर पहा!

[ लंगडत लंगडत जातो. गोपाळ चकित होऊन पहात रहातो. दुसऱ्या बाजूनें रेणुका येते. गोपाळला पाहून दचकते. त्याच्याकडे न पाहतां बोलते. ]

**रेणुका :** आमचे भाऊजी दिसले कुठं ?

**गोपाळ :** नाहीं ! कां ?

**रेणुका :** एक संकट आलंय मोठं.-पण त्यांना तरी सांगून काय होणार ?—

**गोपाळ :** मग मला सांग. माझ्याकडून होण्याजोगं आहे का कांहीं ?

**रेणुका :** कसं सांगूं ?—अगदीं घाबरून गेलेंय् मीं ! अगदीं आर्वा उडालाय माझा !—काय संकटं येताहेत एक एक ! दादाकडे गेलें होतें, पण तोहीं घरीं नव्हता. कसा घाबरून गेलाय जीव !

**गोपाळ :** काय झालंय असं ?—

**रेणुका :** रूपाजीराव दिसले कुठं तुम्हांला ?

**गोपाळ :** हो. आतांच गेला तो इथून. चांगलाच मार बसलाय बेट्याला—

**रेणुका :** ( दचकून पाहून ) ते पहा-ते पहा पाटलाच्या चावडीवर गेले रुपाजीराव !—काय होणार आहे आतां ? मोतीला तुरुंगांत नाहीं ना टाकायचे ?—

**गोपाळ :** कसा धीर केला त्या पोरानं ! कां मारलं त्यानं त्याला ?

**रेणुका :** मला तरी कुठं माहित आहे ?—( पाहून ) ते पहा-ते पहा— पोलीस पाटील अन् रुपाजी कानगोष्टी करताहेत. जरा पहाल का जाऊन ?

**गोपाळ :** थांब हं-इथंच थांब-मी पाहून येतों तोंवर. ( जातो )

[ रेणुका तो जात असतांना त्याच्याकडे पहात असते, तोंच दुसऱ्या बाजूनें जिवा येतो. ]

**जिवा :** कोण ! रेणे ! (ती दचकते) काय पहातेयस ? अजून गोपाळवर नजर आहे तुझी ?

**रेणुका :** काय बोलतोस हें दादा ! मी घाबरून गेलेंय अगदी. मोठं संकट आलंय—

**जिवा :** मला कळलंय् तें. मला वाळीत टाकलं म्हणे–त्याची पर्वा नाही मला–पण तुझ्या दृष्टीनं ते संकट आहे खरं—

**रेणुका :** तें नव्हे रे दादा. हें वेगळंच संकट आहे—मोती कुठं आहे ?

**जिवा :** असेल कुठंतरी भटकत ! कां ?

**रेणुका :** संकट आहे तें माझ्यावर नव्हे–तुझ्यावर म्हटलं असतं—पण तूं कुणाचं बरं वाईट स्वतःला लावून घेत नाहींस. हें संकट आहे तें मोतीवर–

**जिवा :** मोतीवर ? त्या बावळयावर कसलं येणार आहे संकट ? कधीं कुठं जात नाहीं–कुणाच्या अध्यांत मध्यांत पडत नाहीं—

**रेणुका :** पण यावेळीं गेला–त्यानं मारलं—

**जिवा :** मारलं ? मोत्यानं मारलं ? कुणाला ? किडीला–मुंगीला कीं गोगलगाईला ?

**रेणुका :** कीड मुंगीला नव्हे कीं गोगलगाईला नव्हे, चांगल्या फड्या सापाला मारलं !—रुप्याला मारलं मोतीनं—म्हणून तर घाबरलेंय मीं !

**जिवा :** रुप्याला मारलं ? मोतीनं रुप्याला मारलं ?

**रेणुका :** वाः काय ! त्याचा परिणाम काय होईल याची कल्पना आहे का तुला ?

**जिवा :** बरं ! बरं—कां मारलं मोतीनं रुप्याला ?

**रेणुका :** मंदेला कांहीं त्रास देत होता वाटतं तो. ती धड कांहीं सांगेचना मला. नुसती हंसत सुटली होती–मला तुझी आठवण येते दादा लहानपणची–बाबानीं मारलं कुणाला म्हणजे ती हकीकत सांगतांना तूं देखील असाच हंसत होतास लहानपणीं—

**जिवा :** माझ्या लहानपणची आठवण अं ! मोठी आजीबाईच बोलतेय जशी ! जसा कांहीं पाळणा हलवला होतास माझा !

**रेणुका :** आलास पुन्हां आपल्या वळणावर ! काय झालंय याची आहे का तुला कांहीं तमा ? आतां मोतीचं काय ? मंदा म्हणाली, रुपा तंबी देत होता त्याला !

**जिवा** : नुसती तंबीच दिलीन् ? थप्पड नाहीं दिली एक लगावून ? मोतीनं मारलं अं रुप्याला !

**रेणुका** : हा तूं असला बाप ! त्याला कसं वागवायचं ते कळतंय कां तुला ? समज, त्यानं आतां खटला भरला—

**जिवा** : तर काय ? मोती तुरुंगांत जाईल—कदाचित् दंडावर सुटेल—तसा चांगलासा साक्षीपुरावा झाला नाहीं तर अजिबात सुटेल. बाकी साक्षीपुरावे तयार करण्यांत रुप्या लोहार चांगलाच वस्ताद आहे म्हणा.

**रेणुका** : किती निर्दय आहेस रे तूं ! पोटच्या गोळयाचा हाच का तुझा जिव्हाळा ?

**जिवा** : मग काय करूं ? रडूं ? सांग ना ! मी काय करणार ? मोतीनं रुप्याला मारलं—रुप्यानं त्याला उलटून मारलं कीं नाहीं तें तुला ठाऊक नाहीं कीं मलाही ठाऊक नाहीं—मारामारी केली तर त्याचा परिणाम भोगला पाहिजे त्यानं !

**रेणुका** : उगीच ही गोष्ट काढली तुझ्यापुढं—( हुंदका देते. )

**जिवा** : असं पहा रेणे, या कायद्याच्या बाबी आहेत. करावं तसं भरावं ! इथं तुझं माझं कांहीं सुद्धां चालणार नाहीं. त्यानं मारलं ना त्याला ? आतां—

**मोती** : ( प्रवेश करून ) बाबा !

**जिवा** : आलास ! काय दिवे लावलेस आज ?

**मोती** : ( अडखळत ) रुप्याला मी मारलं ?

**जिवा** : कितीसं मारलंस ?

**मोती** : ( अवसान येऊन ) चांगलं तुडवलं ! चांगली हड्डी नरम केली त्याची ! पंधरा दिवस उठायचा नाहीं आतां ?

**जिवा** : छान ! एवढं तरी एक समाधान आहे. उगीच खोटा आळ येऊन शिक्षा होण्यापेक्षां हें ठीक !—त्यानं मारलं वाटतं तुला ?—

**मोती** : आधीं मी मारलं—मग त्यानंसुद्धां एकदोन तडाखे दिले मला—मग असा बडवून काढला त्याला, हात उचलायलासुद्धां अवसर दिला नाहीं.

**रेणुका** : मोती, वेड्या, काय केलंस हें ? रुपाजीचा दरारा केवढा आहे तें माहित आहे ना तुला ? आतां त्यानं तुझ्यावर खटला भरला—

**जिवा** : तर जाईल तुरुंगात. तुरुंगात गेला म्हणून तो नालायक नाहीं ना वाटायचा तुला ?

( शिपाई येतात )

**जिवा** : आलं वाटतं धरणं ?

**शिपाई** : चल मोत्या, चल चावडीवर !

**मोती** : येतों आत्या–येतों बाबा–आतां तुम्हींच करा जेवण! तेवढ्या संकटांतून तरी सुटलों. ( शिपाई त्याला घेऊन जातात )

**जिवा** : आतां तूं आपल्या घरीं जा रेणे—

**रेणुका** : आतां काय करणार आहेस ?

**जिवा** : कांहींसुद्धां नाहीं—जेवण करणार आहे आतां ! प्रश्न आहे तो हाच, कीं शिजवायचं काय ?–( बोलत बोलत जातो )

**रेणुका** : ( आपल्याशींच ) कांहींसुद्धां केलं नाहीं यानं ! ( जाते )

## प्रवेश ४ था

[ गांवांतला एक रस्ता. गोपाळ रस्त्यानें जात आहे तोंच त्याच्या-मागून धांवत मंदा त्याला हाक मारीत येते ]

**मंदा** : गोपूकाका !—गोपूकाका !—

**गोपाळ** : कोण, मंदा ? काय आहे ?

**मंदा** : काय आहे तें माहीत नाहीं तुम्हाला ? कशाला हें ढोंग करतां ? काका बोलत नाहींत–आई सांगत नाहीं–जिवामामाचा कुठं पत्ता नाहीं—तुम्हीं देखील घराला कुलूप लावून पळ काढलेला ! सारा गांव बोलतोय, अन् काय आहे म्हणून तुम्हीं विचारतां मला ?

**गोपाळ** : तसं आहे म्हणायला पुष्कळच आहे. गांवांत ही देवीची सांथ आली आहे—

**मंदा** : देवीची सांथ राहूं दे,-पण ही जी एक किरका बसली आहे गांवाच्या मानगुटीला—

**गोपाळ** : कुठली किरका ?

**मंदा** : आतां काय म्हणायचं तुम्हांला ? कळूनसवरून कशाला हें वेड पांघरतां ? मोती कुठंय ?

**गोपाळ** : मला काय ठावूक ? तो काय माझ्या घरीं असतो ?

**मंदा** : तुमच्या घरीं नसतो तें माहीत आहे मला ! यावेळीं तो आपल्या घरीं नाहीं हेंही मला माहित आहे-अन् तो कुठं आहे यावेळीं हेंही तुम्हांला माहीत आहे-आहे ना ? मग काय करायचं आतां ?

**गोपाळ** : कशाबद्दल ?

**मंदा** : ( चिडीला येऊन ) आतां तुरुंगात आहे ना तो ?

**गोपाळ** : हो ! पण—

**मंदा** : चला तर मग पाटलाकडे—

**गोपाळ** : कशाला ?

**मंदा**: चला-आपण पाटलाची समजूत घालूं—

**गोपाळ** : समजूत कशी घालायची ?-पाटील काय करणार तिथं ? रुप्यानं फिर्याद दाखल केली असेल—

**मंदा** : फिर्याद कशी करतां येईल ? साक्षीदार कोण होते तिथं ? माझ्याखेरीज दुसरं कुणीच नव्हतं तिथं !—आम्हीं दोघं इथंच तुमच्याकडे बसलों होतों म्हणून सांगूं.—तुम्हीं द्या तशी साक्ष—( गोपाळ उगीच रहातो ) कां ? उगीसे राहिलांत ! धीर होत नाहीं ! मग एवढी आपुलकी कसली गाजवतां ? मोती तुरुंगांत गेला तर तुम्हांला मोठा आनंद होईल नाहीं ? खोटी साक्ष द्यायला भीतां ?

**गोपाळ** : तसं नव्हे ग, खोट्याची मला चीड आहे, तरीही यावेळीं मीं खोटी साक्ष देखील देईन-पण त्याचा उपयोग झाला पाहिजे ना ?—( क्षणभर दोघेही स्तब्ध ) मंदे, पोरी, जें कांहीं करायचं तें विचारानंच झालं पाहिजे. खोटं बोललं तर त्याचं चीज झालं पाहिजे. मला यांत कांहीं

कळत नाहीं. विचारायचं म्हटलं तर जिवाला, पण खोट्या साक्षीचं नांव काढलं तर तो टाळकं शेकील माझं !—

**मंदा** : नको-नको ! मामाला नाहीं पटायचं तें. तोच आमच्या उलट साक्ष द्यायचा कदाचित्—

**गोपाळ** : होय ना ? मग काय करायचं ? कुणीतरी साक्षीदार तयार करायचे म्हटलं तर पैसे पाहिजेत. तसा देखील प्रयत्न केला मी. देवाची शपथ घेऊन खोटं बोलायचं ना-तेव्हां देवाचा कोप घालवायला देवाला कांहींतरी कोंबडं-बकरं द्यावं लागणार म्हणून पैसे मागतात हे साक्षीदार. दोन तरी साक्षीदार हवेत ? प्रत्येक जण दहा दहा रुपये मागतोय-कुठून तरी वीस रुपये उभे करायच्या तजविजींत आहे मी !—

[ पडद्यांतून जिवाची हांक 'गोप्या !' गोपाळ दचकतो आणि मागें पहातो. जिवा येतो. ]

**जिवा** : गोप्या, गाढवाच्या लेका, हे धंदे चालवलेयस ? रुप्याच्या पंक्तीला बसतोस ? लाज नाहीं वाटत ?—माझ्या पोरासाठीं तूं हीं खोटीं कामं करतोस ? काय वाटलं तुला ? माझा मी समर्थ नाहीं असं वाटलं ? एवढा ताडामाडासारखा मी त्याचा बाप जिवंत असतांना तुझी मध्यस्ती कशाला हवीय रे शेंबडीच्या ?

**गोपाळ** : तसं नाहीं—तसं नाहीं—

**जिवा** : गप्प बैस ! आणखीन् वर खोटं बोलूं नकोस. ऐकलंस ? माझा मुलगा तुरंगांत गेला तरी चालेल-दोन वर्षं खडी फोडीत राहिला तरी चालेल, त्यानं मारामारी केलीच आहे-केल्या कर्माचीं फळं भोगील तो-कांहीं मंगळ-सूत्र तुटत नाहीं त्यांत त्याचं-अन् माझं ही ! पण खोट्यापायीं बचाव नको व्हायला त्याचा !

**मंदा** : मग काय करायचं तर !

**जिवा** : अन् तूं देखील याला सामील ! नव्हे, तूंच देतेयस याला फूस अन् हा गाढव ऐकतोय ! काळीज काय तें तुलाच आहे-होय रे ! माझ्या पोराबद्दल मला कांहींच का वाटत नाहीं ? तीन दिवस आज कोंडून ठेवलंय मोत्याला-कोणत्या आधारावर ? बोल ना गोप्या !

**गोपाळ** : तें मीं काय सांगूं!

**जिवा** : हीं तुझी अक्कल! आम्हां खेड्यांतल्या लोकांना कायदा कळत नाहीं म्हणून पचताहेत हे असले प्रकार! शाळेंत जाऊन शिकलाहेस तें हेंच का ?

**गोपाळ** : शाळेंत कुठं कायदा शिकवताहेत ?

**जिवा** : तेंही खरंच! इतिहास भूगोल शिकवताहेत शाळेंत! हीं गांवचीं कुलंगडीं काय इतिहास भूगोल शिकून उलगडणार आहेत? आधीं कायदा शिकवा म्हणावं आम्हां लोकांना! रोज या खोत, पाटील, कुलकर्ण्यांशीं संबंध—त्यांना काय इतिहासाची सनावळी सांगायची कीं विलायतेंतल्या नद्यांचीं नांवं सांगायचीं? इथं तोंड द्यायचंय आम्हाला या पाटील कुलकर्ण्यांना—आणि हे गाढवाचे ढस्स कायदा टाकून इतिहास-भूगोल शिकवताहेत आम्हां लोकांना! थोडा कायदा कळला असता तुला म्हणजे कशाला गेला असतास दहा दहा रुपये देऊन साक्षीदार बनवायला? चल माझ्याबरोबर, तुला गम्मत दाखवतों. (जायला निघतो त्याच्या मागोमाग गोपाळ आणि मंदा येऊं लागतात) तुझं काय ग पोरटे—तूं जा आपल्या घरीं—चल रे गोपाळ! (जातात)

## प्रवेश ५ वा

[ पाटलाची चावडी. पाटील गुडगुडी ओढीत बसला आहे. बाजूला नोकर हातांत फडका घेऊन उभा आहे ]

**पाटील** : (गुडगुडी ओढीत ओढीत) मोठी आफत आली आहे ही! काय करायचं आतां? तिकडे सरकारची तंबी, तर इकडे लोकांची गडबड! देवी डाक्टर येऊन बसलाय पण त्याचं ऐकत नाहीं कुणीच. मी तरी काय करूं? हे लोक बाया खेळवताहेत—एवढीं एवढीं पोरं घेऊन उघड्यावरून मिरवणुकी काढताहेत गांवातून, अन् हीं पोरं उद्यां मेलीं फटाफट तर दोष कुणाचा?

**नोकर** : (त्याच्या प्रत्येक शब्दाला 'होय होय' म्हणत) तें तर खरंच! काय देवी टोंचून देवी जातात? शितळादेवीचा कोप झालाय तिथं लस टोंचून काय होणार?

**पाटील :** अरे तें मला पटतंय-पण सरकार दरबारला काय तसं सांगतां येतं ? मी पाटील आहें ना इथला ? जबाबदारी आहे माझ्या शिरावर. देवी डाक्टर करील रिपोट तर गदा येईल पाटीलकीवर ! मोठा पेंच आलाय हा. त्यांतून ही मोत्याची भानगड ! तीन दिवस झाले पण त्या रुप्याचा पत्ताच नाहीं. कुठं गेलाय जीव द्यायला ? आतां माझ्या गळ्याला मात्र फांस लावील.

**नोकर :** त्यांत कसला लागणार फांस ?

**पाटील :** अरे आतां काय सांगायचं तुला ? त्याला झाली होती घाई डाक्टरचं सर्कीपिट घ्यायची. फिर्यादसुद्धां दिली नाहीं गाढवानं लिहून. ( आंतून जिवाचा आवाज-कडाडून हाक येते 'पाटील' ) आतां आला हा राक्षस !

[ जिवा आणि गोपाळ येतात. ]

**जिवा :** पाटील !-आम्हीं आलों आहोंत—( पाटील कांहीं उत्तर न देतां गुडगुडी ओढतो ) पाटील, कायदा म्हणून आहे का कुठं ?

**पाटील :** रीतभात म्हणून आहे का कुठं ? रामराम केला नाहींस !

**जिवा :** असं होय ? रामराम रे पाटला रामराम ! ( विचित्रपणें हंसून ) आतां बोल—कायदा कळतो का तुला ?

**पाटील :** ( गुडगुडी दूर न करतां ) पुढं बोल !

**जिवा :** आज तीन दिवस झाले, मोतीला कोठडींत कोंडून ठेवलंयस—

**पाटील :** हो-हो-! मग भीतों कीं काय तुझ्या बापाला ?

**जिवा :** तसा मोठा धीराचा आहेस रे तूं—मोठा उलट्या काळजाचा आहेस तें माहीत आहे मला ! कुठल्या कायद्याखालीं कोंडून ठेवलयंस रे त्याला ? (पाटील गुडगुडी ओढीत नुसता हंसतो ) हंसण्यावरी नेऊन भागायचं नाहीं-बोल, कोणत्या कायद्याखालीं त्याला अटक केली आहेस ?—तीन दिवस कोंडून ठेवलंयस ? चोवीस घंट्याची शिक्षा द्यायचा अधिकार आहे तुला—पण तोसुद्धां खटला चालून निकाल लागल्यावर—अजून खटलासुद्धां चालवला नाहींस—फिर्याद तरी गुदरली आहे का ?

**पाटील :** तूं कोण मला विचारणार ?

**जिवा** : पुन्हां विचारतों, फिर्याद तरी गुदरली आहे का ?

**पाटील** : गप्प बैस ! मला विचारणारा तूं कोण ?

**जिवा** : मी कोण ? मी रयत ! कुणासाठीं तुला पाटील नेमलाय ? या गांवच्या रयतेसाठींच ना ? त्या रयतेंतला मी एक–तुझा धनी ! तुझा मालक ! तुला इथं नेमलाय. तो आमच्या राखणीसाठीं कीं गांजणीसाठीं ? फिर्यादी-शिवाय:कोंडून ठेवतोस माणसाला ? आतांच्या आतां सोड मोत्याला—

**पाटील** : तूं मला हुकूम करतोस ?

**जिवा** : हो–हो–! मी हुकूम करतोंय तुला–तुझा मालक–तुझ्या मामलेदाराचा मालक–अन् तुझ्या कलेक्टरसाहेबाचा देखील मालक !—मी हुकुम करतोंय् ! आत्तांच्या आत्तां मोत्याला सोड !

**पाटील** : फिर्याद चालायचीय अजून !

**जिवा** : तेंच म्हणतोंय मीं !––मग जामीन घे !

**पाटील** : जामीन घ्यायचा नाहीं. माझा कायदा मी जाणतों–तूं नको मला शिकवायला.

**जिवा** : तुझ्यापेक्षां तुझा कायदा मीच चांगला जाणतों–आत्तांच्या आत्तां मोत्याला सोड !

**गोपाळ** : हा खटला बनावट आहे–बालंट आहे––

**जिवा** : तूं गप्प रहा गोप्या !–पाटील, बऱ्या बोलानं तूं माझं ऐकतोस कीं मी तालुक्याला जाऊं ?

**पाटील** : काय करणार आहेस तालुक्याला जाऊन ?

**जिवा** : तें तुला माहित आहे, मला माहित आहे, अन् रुप्पाला सुद्धा माहित्त आहे. मामलेदार असतो ना तिथं ? वर्दी देऊं मामलेदाराला ? खटला चालवल्याशिवाय तीन दिवस कोंडून ठेवलंयस अशी वर्दी देऊं मामलेदाराला ?

**पाटील** : बरं–बरं ! जामीन कोण देतोस ?

**जिवा** : आतां जामीनाची गोष्ट राहूं दे. फिर्याद कुठं आहे ? काय आहे फिर्याद ! दाखव पाहूं. मला नक्कल हवी आहे त्या फिर्यादीची—

**पाटील** : फिर्याद पहा खटल्याच्या वेळीं !

**जिवा :** असं होय ?–ऐकून घे गोप्या. तुला साक्ष द्यावी लागेल मामलेदारा-पुढं. ठीक आहे ! मी चाललों तालुक्याला—

**पाटील :** हें पहा जिवबा, किती झालं तरी आपण जुने दोस्त—

**जिवा :** आधीं फिर्याद दाखव मला—

**पाटील :** ते असं आहे जिवबा—

**जिवा :** बस्स कर ! तुला काय सांगायचं असेल तें मामलेदारसाहेबांना सांग. जुने दोस्त म्हणे ! फिर्यादीशिवाय मोतीला पकडलं त्या वेळीं कुठं गेली होती जुनी दोस्ती ?

**पाटील :** आधीं ऐकून तर घ्या जिवबा, मी सोडून देतों मोतीला–माझ्या अधिकारांतली गोष्ट आहे ती. मी समजूत घालीन रुपाजीची. जुन्या दोस्ती-साठीं एवढं केलं नाहीं तर मी गांवचा गांवकरी कसला ? झालं गेलं होऊन गेलं. घसरतोच आहे माणूस एकाद्या वेळीं—

**जिवा :** तें काय तें मामलेदाराला सांग. मला कांहींसुद्धां ऐकायचं नाहीं–तूं आहेस आणि मामलेदार आहेत–अन् मामलेदारांचा दोस्त तो रुप्या आहे. तुमचं तुम्हीं काय तें पाहून घ्या. मी चाललों तालुक्याला–चल रे गोपाळ—

**पाटील :** असं पहा जिवबा, जरा थांबा म्हणतों ना ! मी असं म्हणतों, काय केलं म्हणजे समाधान वाटेल तुम्हांला ?

**जिवा :** माझ्या समाधानाचा प्रश्न नाहीं. तूं बेकायदेशीर गोष्ट केली आहेस. मी जाऊन मामलेदारांना वर्दी देणार. तशीं वर्दी द्यायला नको असली तर मुकाट्यानं मोत्याला सोड—

**पाटील :** तें कसं व्हायचं ?—

**जिवा :** त्याला आतां सोडलास तरीसुद्धां तूं कांहीं सुटत नाहींस कायद्याच्या कचाटींतून ! तरीसुद्धां मला फिर्याद करतां येईल मामलेदाराकडे—पण या क्षणाला त्याला सोडलास—

**पाटील :** तर नाहीं जायचास तालुक्याला ?

**जिवा :** नाहीं जायचा असं मीं म्हटलं असतं—पण तुला ही मोठी वाईट खोट लागलीय. रुप्या सांगतो आणि तूं ऐकतोस–अन् धाऱ्यावर बसवतोस

सारे कायदे! हवालदील झाले आहेत सारे लोक! बरा सांपडला आहेस यावेळीं–एकदां अद्दल घडली पाहिजेय तुला!

**पाटील :** असं पहा जिवबा, चूक होतेच आहे माणसाच्या हातून. मलासुद्धां या रुप्याच्या हा जोरा सहन होत नाहींसा झालाय त्याचीसुद्धां होऊं दे एकदां फटफजिती मोत्याला मी सोडून देतों, पण मग तक्रार करायची नाहीं तालुक्याला!–अरे राम्या–( गादीखालच्या किल्ल्या काढून घेऊन ) या किल्ल्या घे, कोठडी उघड अन् मोत्याला सोडून दे. ( जिवाला ) आतां झालं तुझं समाधान? गेला न आतां तुझा राग?

**जिवा :** हें आधीं कळायला हवं होतं तुला. कायदा कळत नाहीं तर पाटिलकी कशाला करतोस? दुसऱ्यावर विसंबून अधिकार गाजवायला गेलं कीं असं तोंडघशी पडायला होतं—

**पाटील :** बरं–बरं–जाऊं दे. घे ही गुडगुडी–दोन झुरके तर मार—

**जिवा :** अरे वाळींत टाकलंय ना मला? गुडगुडीपाणी बंद केलंय ना माझं?

**पाटील :** तें गावांत! ही सरकारी चावडी आहे. गांवकीचं कांहींसुद्धां चालत नाहीं इथं!

**जिवा :** तुझा आदरसत्कार पोहोंचला मला!–जेवायला घालून पाठवून दे मोत्याला–उपाशीं ठेवला नव्हतास ना त्याला?

**पाटील :** छे छे! असं कसं होईल? कायदा म्हणजे कायदा!

**जिवा :** बरं–बरं! ( गोप्याला घेऊन निघून जातो )

**पाटील :** हें बघ राम्या, आतां सोडून दे त्या मोतीला. माझ्या घरीं नेऊन जेवायला घाल पोटभर–( गादीखालून एक रुपया काढून ) अन् हा एक रुपया दे त्याला. जाऊं दे. गरीब आहे. ( हंसतो ) पाहिलंस कसं बनवलं या जिव्याला? असं करावं लागतं!–त्या रुप्या लोहारानं सारी घाण केली. यावेळीं कशाला मरायला गेला इस्पितळांत?

**नोकर :** जाऊं द्या. पुन्हां सांपडेल केव्हांतरी. गांवांतच आहे ना? जातोय कुठं!

[ नोकर एका बाजूनें जातो. दुसऱ्या बाजूनें रुप्या येतो. ]

**रुपा :** आतां जाम झालं सगळं ! डॉक्टरचं सर्टिफिकीट आणलं—

**पाटील :** आतां त्या सर्कीपिटाची सुरळी करा आणि घाला चुलींत—

**रुपा :** कां ?—काय झालं ?

**पाटील :** मी सोडून दिला मोत्याला !

**रुपा :** तूं सोडून दिलास ? काय म्हणून ?

**पाटील :** तर काय करूं ? तीन दिवस झाले–तुमचा पत्ता नाहीं–लेखी फिर्याद दिल्याशिवाय निघून गेलां–तुम्हाला घाई सुटली होती डॉक्टरकडे जायची—

**रुपा :** घाई कसली ? जखमा होत्या आंगावर तोपर्यंत गेलं पाहिजे होतं ना ?

**पाटील :** तें खरं—पण इथं बेअब्रू झाली माझी. जिव्या लोहारानं मला धरलं पकडींत. मिशीला पीळ भरून कशीबशी वेळ मारून नेली अन् दिलं सोडून मोत्याला ! तुम्हांला सांगून ठेवतों, यापुढं तुमचं कांहींसुद्धां ऐकणार नाहीं मी—

**रुपा :** असल्या भेकडाला पोलीस पाटील केलाय !

**पाटील :** नकोच आहे ही पाटीलकी मला ! नुसतं नांव माझं आणि रुबाब मिरवायचा तुम्हीं ! त्यापेक्षां नसली पाटीलकी म्हणून काय बिघडलं ?

**रुपा :** बरं, बरं ! कळली अक्कल ! उद्यां जाऊन भेटतों कलेक्टरला. वरचा हुकूम आला कीं पाय चाटशील माझे—

**पाटील :** मग होऊन जाऊंद्याच तर ! कोण कुणाचे पाय चाटतो तें तरी पाहूं ! उद्यां काढून टाकाल तेव्हां टाकाल–पण आज तर माझा इंगा दाखवतों. त्या जिव्यालाच घेतों हाताशीं–त्या कुंभाराला उठवून बालंट घेतों तुझ्यावर-त्यांच्या पोरीची हुरमत काढलीच आहेस—साऱ्या गांवाला माहीत आहे तें-चोवीस तास तरी डांबून ठेवीन तुला कोठडींत !

**रुपा :** असं चिडतां कशाला राव ? झाली गोष्ट होऊन गेली–माझंच चुकलं –असं पहा– ( खिशांतील पाकीट काढून त्यांतील एक नोट काढून ) एवढी राहूं दे ! ( पाटील 'नको नको' म्हणत नोट खिशांत ठेवतो ) जाऊं दे कीं मोत्याला. अशा हजार युक्त्या आहेत माझ्या खिशांत ! त्याच्यासाठीं ही फिर्यादच नको कांहीं. आतां काय करायचं तें मी सांगतों तुम्हाला !—

**पाटील** : आतां पुन्हां आणखी कांहीं घोळ करूं नका म्हणजे झालं !

**रुपा** : त्याची भीती नको. माणसाकडून होत नाहीं काहीं, आतां देव उठवला पाहिजे. देवी आल्या आहेत ना गावांत ?—

**पाटील** : होय! ती आणखी एक आफत झालीय. तिकडे सरकारची तंबी अन् इकडं लोक खवळलेले—मोठा पेंच आलाय्—

**रुपा** : कांहीं नाहीं पेंच. सारं कांहीं उलगडतंय आपोआप. चला माझ्या बरोबर. आधीं गांवच्या गुरवाला गांठला पाहिजे. ( जातात )

## प्रवेश ६ वा

[ देवळाचें पटांगण—मंदा आणि रेणुका प्रवेश करतात ]

**रेणुका** : मंदा, किती सांगितलं तुला, त्यांना असं चिडवूं नकोस. आपण परस्वाधीन आहोत. कुणाचा आधार नाहीं आपल्याला. नको म्हटलं तरी तिकडे गेलीस! काय झालं तें समजलं सुद्धां नाहीं. दादा जाऊन आला पाटलाकडे. विचारलं तर कांहीं बोलत नाहीं.

**मंदा** : तो स्वभावच आहे त्याचा. मी तुला सांगून ठेवतें आई, आतां नाहीं हें माझ्यानं सहन करवत! जीव द्यावासा वाटतो केव्हां केव्हां—

**रेणुका** : असं बोलूं नये मंदा—

**मंदा** : बोलूं नये तर काय करावं ?—सरळ जाऊन नदींत जीव द्यावा ? सहन तरी किती करायचं ? भट्टीला कोळसे नाहींत तें माहित आहे मला—पण तीं पलीकडचीं ओंडकीं पहा. तीं काय मला उचलणार आहेत ? तीं उचलून आण म्हणून सांगितलंय काकानीं, म्हणून आलें पळून. इकडे माझा जीव टांगलेला—आई, सोडतील का ग मोतीला तुरुंगांतून ?

**रेणुका** : मी काय सांगूं ? कांहीं अधिकार आहे का माझ्या हातांत ? कुणाकडे जाऊं ? कुणाला विचारूं ? उपाय आहे एकच—( थांबते.)

**मंदा** : बोल ना—कुठला उपाय ?

**रेणुका** : तुला माहित आहे तो—

**मंदा** : त्या बेरडाशीं लग्न लावून द्यायचं माझं–हाच ना ? मग जीव दिलेला काय वाईट ? तें लग्न म्हणजे मरणाहून मरण–जन्मभर तें तसलं मरणाचं जिणं जगण्यापेक्षां सरळ नदींत उडी घेतलेली काय वाईट ? ( क्षणभर दोघीही स्तब्ध ) बोल ना—

**रेणुका** : कसा कंटाळा आलाय जिवाचा ! काय बोलूं ? मलासुद्धां वाटतं केव्हां केव्हां–असंच जावं आणि कुठंतरी जीव द्यावा !

**मंदा** : तुलासुद्धां वाटतं ना असंच ? मग मला कां म्हटलंस तसं ? आम्ही जाऊं चल जिवामामाकडे–आम्हालासुद्धां टाकूं दे वाळींत–मग तरी त्या बेरडाची कटकट चुकेल—

**रेणुका** : ( खिन्नपणें हंसून ) किती वेडी आहेस ग पोरी ! त्याचंच त्याला कठिण जातंय तिथं आमचीं लोढणीं कशाला त्याच्या गळयांत ?—इथं अन्न तरी मिळतंय घांसभर–सत्तेचं आहे तें अन्न आमच्या ! कुठं उपकार नाहींत कुणाचे—दादाकडे तेंसुद्धां नाहीं—कुणाचाच धंदा चालत नाहीं—काय करायचं अशा वेळीं ?

**मंदा** : म्हणून घरच्या पोरीला काय बेरडाच्या गळयांत बांधायची ? आतां पुरे झालं आई. नाहीं मला हें सहन होत ! याचा कांहींतरी सोक्षमोक्ष लागायलाच हवा—( आंतून मोती कविता म्हणत येत असल्याचें ऐकूं येतें )

**मंदा** : मोती ! आई, मोती आला–( मोती येतो ) आलास ? कसा सोडला रे त्यांनीं तुला ? किती रे वाळलास हा चार दिवसांत ?

**रेणुका** : काय तुझी दशा झाली ही मोती !

**मोती** : छान–छान ! वाळलों म्हणे ! दशा झाली म्हणे ! वाळलों कसला–फुगलों म्हणा. चैन झाली चार दिवस ! काम नाहीं, धाम नाहीं, भाता फुंकायला नको, जेवण करायला नको–अन् जेवायलासुद्धां मिळत होतं चांगलं पोटभर ! आपल्याला तर बुवा घरीं रहाण्यापेक्षां तुरुंगांतच राहणं आवडलं !–रडतेस मंदे ? अन् तूं पण आत्या ?

**रेणुका** : नाहीं रे बाळ, कशाला रडेन मी ? आनंद झाला मला तुला पाहून ! कसं भडभडून आलं आंतून ! कसा सोडला रे तुला ?

**मोती** : काय झालं कोण जाणे ! चांगलं घरीं नेऊन जेवायला घालून वर एक रुपया दिला मला.–हा बघ–आतां चार दिवसांची तरी बेगमी झाली—

**रेणुका** : दादाला नाहीं भेटलास ? त्यांनं नाहीं का कांहीं सांगितलं ?

**मोती** : ( हंसत मंदेकडे पहातो ती लाजते ) त्यांना काय होय ! त्यांना कुठंय माझी काळजी ? म्हणून निघालों आधीं तुम्हांला भेटावं म्हणून— अन् रस्त्यांतच भेटलां तुम्हीं—

**मंदा** : आत्तां तूं घरीं जा आई, हा आलाय आतां. ओंडकीं न्यायला हात लावील मला—

**रेणुका** : ( हंसून ) समजलें बरं ! अन् असं पहा मोती, फार वेळ राहूं नकोस इथं. आधीं घरीं जा. तिकडे बाप असेल तुझा काळजींत. ( जात )

**मोती** : हंः ! बाप काळजींत असेल म्हणे ! त्यांना लागलीय जगाची काळजी. त्यांना कुठंय आपल्या मुलांची आठवण !—अजून रडतेयस मंदे ?

**मंदा** : ( डोळे पुशित ) नाहीं रे—किती किती दिवस भेटला नाहींस तूं !– रडरडून रात्री काढीत होतें मी—

**मोती** : अन् दिवस ?

**मंदा** : दिवस होय ? काका असतात ना घरांत ? रडतांना पाहिलं तर डोळेच काढतील माझे–असे डोळे कोरडे करून बसत होतें--

**मोती** : आतां कसं दिलं त्यांनीं जायला ?

**मंदा** : नुसतं कसं दिलं ? सारखे मागं लागले होते जा जा म्हणून–पण मीच येत नव्हतें. शेवटीं लोटून घालवलं मला—

**मोती** : मला भेटायला ?

**मंदा** : नव्हे रे–लाकडं आणायला–भट्टीसाठीं कोळसे हवेत ना ?

**मोती** : कुठं आहेत तीं लाकडं ?

**मंदा** : ती तिकडे पलीकडे !

**मोती** : तीं का ? हीं एवढीं मोठीं ओंडकीं तूं नेणार ?

**मंदा** : मग तुला कशाला आज सोडला तुरुंगांतून ?

**मोती** : हीं तुझीं ओंडकी वाहून न्यायची हमाली करायला !

**मंदा** : हो–हो–! हमालीच करायला-आतां हमालीच करायचीय तुला जन्मभर-त्याची तालीम आहे ही! काम करायला नको म्हणून मुद्दाम तुरुंगांत जाऊन बसला होतास—

**मोती** : पण कां सोडून दिलं मला तेंच तर कळत नाहीं!

**मंदा** : तर मग ऐक. मी सांगतें-तुला सोडवलं तें जिवामामानंच पण कसं सोडवलं तें मात्र माहित नाहीं मला—

**मोती** : हें कुणी सांगितलं तुला? गोपूकाकानं?

**मंदा** : त्यानंतर त्यांची माझी कुठं भेट झाली आहे? मला आपलं आपसुकच कळलं. पिंगळा बोलला समोरच्या पिंपळावर बसून!

**मोती** : मला बनवते आहेस होय? मी गोपूकाकांनाच विचारीन आतां जाऊन!

**मंदा** : चल तर आपण बरोबरच जाऊं–पण हीं लाकडं नेलीं पाहिजेत ना घरीं?—

**मोती** : काय हमाली देणार आहेस मला?

**मंदा** : एक गाणं ऐकवीन तुला.

**मोती** : कसलं गाणं? तमाशांतली छकडच ना? तें तुझं गाणं रोजचंच आहे. मला नकोय तें ऐकायला—

**मंदा** : थांब थांब. आधीं गाणं राहूं दे अन् लाकडंही राहूं देत. आधीं आड हो कुठंतरी. तें पहा कोण येतय! चल–चल–लवकर.

( मंदा मोतीला ओढून नेते. दुसऱ्या बाजूनें रुपा आणि शिवा येतात. )

**रुपा** : हें पहा शिवबा, देवाचा कौल काय मिळेल तें सांगता यायचं नाहीं. पण एवढं खरं, कीं जिवा लोहाराची या गावांतून आतां उचलबांगडी होणार खास. आतां पुढल्याच महिन्यांत मुहूर्त आहेत, त्यावेळीं हें कार्य उरकून घ्यायला हवं.

**शिवा** : तें तर ठरलंच आहे–पण आजच्या या प्रसंगांतून माझी कशी सोडवणूक होणार? तें कांहींतरी आधीं करा—

**रुपा** : असं पहा शिवबा, पैसे द्यायला माझी हरकत नाहीं–पण कसल्या

तारणावर द्यायचे? घर तुम्हीं आधीच लिहून दिलंय-घरांत कुणाच्या अंगावर फुटका मणीसुद्धां नाहीं-कसे पैसे वसूल व्हायचे माझे?

**शिवा :** तेंच कळत नाहीं ना मला! म्हटलं आपली ही सोयरीक जमली-

**रुपा :** नुसते झुलवतांहांत तुम्हीं. किती वर्षं गेलीं अशीं? तुमच्याच घरचीं माणसं गांवभर माझी बदनामी करीत हिंडतात. उद्यां तुमची भावजय मुलीला घेऊन कुठं पळून गेली तर काय करणार तुम्हीं?-या कर्जफेडीसाठीं म्हणून मी म्हणत नाहीं-माझ्या सग्या सोयऱ्याच्या घरीं पैसे राहिले तर मला त्याचं कांहीं वाटायचं नाहीं-पण सोयरीक होईल तेव्हां ना?

**शिवा :** त्याची काळजी नको-मी चांगली नजर ठेवली आहे त्यांच्यावर. त्यांची काय बिशाद लागली आहे पळून जायची?

**रुपा :** असं म्हणून चालायचं नाहीं शिवबा. जिवा लोहार अगदीं मेटाकुटीला आलाय-समजा, उद्यां यांना घेऊन पळून गेला मुंबईला-तर तिथं पत्तासुद्धां लागायचा नाहीं.

**शिवा :** तो काय जातो पळून! अन् इतक्या माणसांना न्यायला पैसे कुठं आहेत कुणाजवळ?-त्याची काळजी नको तुम्हांला-पण हा जो फांस लागलाय माझ्या गळयाला—

**रुपा :** तुमच्या नव्हे-तो फांस आहे माझ्या गळयाला! कांहीं हरकत नाहीं-आज मी तुमची अडचण भागवतों. पण दसऱ्यापूर्वी निदान साखरपुडा तरी झाला पाहिजे. मी तेव्हांपर्यंत वाट पाहीन-मग मी काय करीन तें आज सांगतां यायचं नाहीं मला! चला आतां माझ्या घरीं. पुन्हां तुम्हांला यायचं आहे ना इकडे? अन् असं पहा शिवबा, आतां मन अगदीं कठोर केलं पाहिजे तुम्हीं-आज देवाचा कौल काय-मिळेल—(बोलत बोलत दोघेही निघून जातात)

[मंदा आणि मोती हळूच पुढें येतात.]

**मोती :** ऐकलंस? काय वाटेल तें कर पण आत्याला म्हणावं एवढा दसरा उलटून जाऊं दे.

**मंदा :** घरसुद्धां गहाण टाकलंय! हें बरं लक्षण नव्हे मोती! उद्यां जप्ती आणली घरावर तर काय करायचं?-घराचा मोठा लोभ आहे माझ्या या आईला-घर बचावण्यासाठीं तिनं जर—(थांबते.)

**मोती** : छे छे! तसं नाहीं व्हायचं. हें बाबांना कळवलं पाहिजे.

**मंदा** : ते काय करणार? किती रक्कम असेल कोण जाणे. घरावर काढलेले पैसे, थोडेथोडके नाहीं असायचे!–मोठा बिकट प्रसंग आला आहे—

(गोपाळ येतो.)

**गोपाळ** : इकडे आलांत का तुम्हीं? घरीं नाहीं गेलास वाटतं मोती? तुझा बाप तिकडे वाट बघत बसलाय तुझी—

**मोती** : हें मला सांगूं नका. बाबा कुणाचीसुद्धां वाट पहायचे नाहींत. सरळच मला जायला सांगा ना इथून–पहावत नाहीं ना? सर्वांचेच डोळे फुटताहेत.

**गोपाळ** : मला कशाला वाईट वाटणार? मी काय तुला नको म्हणतोंय? पण आतां लोक इथं येणार आहेत–आज देव खेळणार आहे इथं–त्यांच्यासमोर तरी तुम्हीं दोघं दिसायला नको एका जागीं. फार काळजी घेतली पाहिजे आपल्याला. जा पाहूं आतां—

**मोती** : अग तीं ओंडकी राहिली आहेत ना न्यायचीं?

**मंदा** : मग ने ना! मी नकों म्हटलंय का तुला?

**मोती** : पण तीं ओंडकीं मी नेऊन तुझ्या घरीं टाकलीं तर चालेल का तुझ्या काकाला?

**मंदा** : जा–जा! आतां ज्यास्त बोलूं नकोस!

**मोती** : बरी हमाली करायला लावतेस मला!—(जातो)

**मंदा** : आज एक बातमी कळली मला गोपूकाका—

**गोपाळ** : मलाही कळलीय ती. उघड उघडच होणार आहेत सारे येर! यांत रुप्याचा हात आहे खास. रुप्यानं गुरवाला चारून जिवाला गांवाबाहेर काढायचा हा कट चालवलाय. मोठं कठीण असतं हे देवस्कीचं प्रस्थ—

**मंदा** : तें नव्हे–हें वेगळंच आहे! काकानीं घर गहाण टाकलंय रुपा लोहाराकडे. अन् दसऱ्यापूर्वी साखरपुडा केला नाहीं तर तो काय करील याचा नेम

नाहीं-स्वतःच असं म्हणाला तो—आतांच आम्हीं आडून ऐकलं दोघांचं बोलणं—

**गोपाळ :** असं का? असं असलं तर मोठं बिकट काम आहे. यांतून मार्ग काढला तर जिवाच काढील. मोठं हुकमी डोकं आहे त्याचं. चांगला अनुभव आलाय मला. (पाहून) तू जा पाहूं आतां. लोक येऊं लागले आहेत. या बाबतींत काय होतं तें मी पहातों. कांहीं काळजी करूं नकोस. तूं जा पाहूं आतां—

[मंदा जाते. गोपाळ बाजूला होतो. पाटील, गुरव, शिवा आणि बरेचसे गांवकरी येतात.]

**पाटील :** तूं आहेसच ना इथं गोपाळ? पहा या लोकांनीं काय काहूर माजवलंय तें! सरकारी हुकमाचा ताबेदार मी-लस टोंचून घ्या म्हणून मी म्हणतों-पण कोण ऐकत नाहीं माझं-देवाचा कौल घ्यायचा म्हणताहेत.

**गोपाळ :** मग घ्या की देवाचा कौल! काय बिघडतंय त्यांत? हे गुरव आलेच आहेत, काय व्हायचं तें एकदां होऊन जाऊं द्या.

**पाटील :** (गुरवाला) देवाला धूप घातलात? काय व्हायचं तें झालं तुमचं? (गोपाळला) होऊन जाऊं द्या तुमच्या मनासारखं—

**गुरव :** घोंगडीं आंथरा इथं. मी एकदां जाऊन देवाच्या पायावर डोकं ठेवून येतों. (जातो)

(कांहींजण घोंगडीं आंथरतात. एकजण धूपदाणी घेऊन येतो आणि धूप घालतो)

**पाटील :** मोठी आफत आली आहे ही माझ्यावर! असं करावं तरी कठीण, तसं करावं तरी कठीण. तिकडे सरकारची पकड तर इकडे गांवच्या लोकांची चावाचाव! कसा पेंचात सांपडलोंय मी--

**गोपाळ :** देवापुढं सरकारला कोण विचारतो पाटील! या आमच्या गांवचं सरकार म्हणजे हा आमचा बहिरोबा. त्याच्या हुकुमापुढं सरकारचा हुकूम काय होय? (गुरव येतो) आलांत? आतां होऊं द्या सुरवात.

**पाटील :** एक रुपाजीच तेवढे नाहीं आले अजून—

**गुरव :** आतां वाट बघायची नाहीं कुणाचीच. चला या. ( गुरव घोंगडीवर बसतो. एकजण त्याच्यापुढें धूपदाणी ठेवतो. सगळेजण त्याच्या बाजूला अर्धवर्तुळांत बसतात. गुरव डोळे मिटून बसलेला आहे. थोड्या वेळानें तो जमिनीला डोकें टेंकतो आणि हुंकार देत उठून बसतो. तो सारखे सुस्कारे आणि हुंकारे देत असतो. त्याचें पुढील सर्व भाषण या हुंकारातच होत असतें )

**गुरव :** लेकरांनो, कां साद घातलीत मला ?

**पाटील :** तूं सगळं जाणतोस महाराजा—गांवावर आभाळ कोसळलंय. आकांत उडालाय जिकडं तिकडे–हें असं कसं झालं महाराजा ?

**गुरव :** लेंकरा, अरे डोळे असून आंधळे झालेत, कान असून बहिरे झालेत, अरे हात-पाय असून गोळे कसे झालेत तुमचे ? अरे, डोळ्यासमोर दुस्मान–

**पाटील :** कोण महाराजा ? आम्ही सारे तुझे भक्त—

**गुरव :** अरे नाहीं-मी माझ्या भक्ताचा पाठीराखा–तुम्हीं माझे भक्त-तुम्हीं मला साद घातला-सादासरशीं आलों ना धावून ?–पण एक पापी–गांवचा एक पापी–एकजण पाप करतो अन् त्याचीं फळ भोगतात माझीं लेकरं ! अरे कांटा टोंचतो पण ओरडत नाहीं कुणी–मग मी तरी काय करूं ?

**पाटील :** कोण हा कांटा देवा ?

**गुरव :** अरे कोण त्या पाप्याचं नांव घेईल ? मी नांव घेईन-मी सांगेन— ( थांबतो )

**पाटील :** मग घे महाराजा त्याचं नांव !

**गुरव :** नांव घेईन–पण सांगेन तें कराल ?–सीमेंतलं पाप सीमेबाहेर घालवाल ?

**पाटील :** कसा कोण तो मायबापा ?

**गुरव :** ( जोराने घुमत ) अरे लोहाराचं कुळ—लोखंडाची कांब-वांकवली तरी वांकत नाहीं–तोडली तरी तुटत नाहीं–माझ्या घरचं लेकरूं–( जोरानें किंचाळून ) अरे माझं लेकरूं माझं नांव घेत नाहीं याची लाज नाहीं का रे तुम्हांला ?

**पाटील :** तो जिवा लोहार काय रे माझ्या मायबापा ?

**गुरव** : ( जोरानें घुमत ) अरे तोच ! तोच ! ! तोच ! ! ! तुम्हीं माझीं लेकरं–तुम्हीं माझं नांव घेतां. तो माझं नांव घेत नाहीं म्हणून नाहीं मला लागत–पण माझं नांव तुम्हीं घेतां म्हणून तुम्हाला तो हंसतो–म्हणून भडका होतो रे माझा ! म्हणून म्हणतों–गांवचा कांटा गांवाबाहेर टाका–गांवची किरका गांवाबाहेर लावा–माझी पालखी काढा– जाखाई, जोखाई शितळादेवी संतुष्ट करा–गांवची पीडा गांवाबाहेर जाते–माझीं लेंकरं सुखी होतात–अरे लक्षुमी चालून येते आहे रे गावांत–पापी दिसतो समोर–लक्षुमी ठेंच खाते नि मागं जाते. ( मोठ्यानें हांक फोडून ) काय रे लेकरांनो–मी सांगतों तसं कराल ?

**सर्व** : ( जमिनीवर डोकें टेकून वर उठून ) जसा देवाचा हुकूम !

**गुरव** : ( बराच वेळ घुमत राहून नंतर एकदम शिवा लोहाराकडे बोट करून, किंचाळून ) नि तूंरे, माझं लेकरूं त्याच्या घरांत घालतोस ?–त्या रंडकीचं ऐकतोस ? लेकरूं कसलं, माझ्या पायावरचं फूल तें–तें शेतखान्यांत टाकतोस !

**शिवा** : ( थरथर कांपत हात जोडून ) नाहीं–महाराजा नाहीं–

**गुरव** : रांडमुंड बोलते–शहाणासुरता ऐकतो–गांवावर कोप होतो शितळा-देवीचा—( शिवाकडे पुन्हां बोट करून भयंकर आवाजांत ) देवाचा कौल तोडशील–वाटोळं करीन–( जमिनीवर थाड्कन थाप मारतो )

**शिवा** : नाहीं महाराजा–नाहीं महाराजा–( धांवत जाऊन गुरवाच्या पायावर डोकें ठेवतो )

**गुरव** : माझं ऐकलंस–सोनं सुवर्ण होईल तुझ्या घराचं–माझ्या पायाला हात लावलास– कबुली दिलीस–आतां तुला भीति नाहीं–जा–( शिवाला लोटतो. शिवा बसल्या बसल्याच मागें सरकतो )

**गुरव** : ( सर्वांकडे हात दाखवीत ) ऐकाल माझ्या लेकरांनों ? माझं ऐकाल ? गांवची किरका गांवाबाहेर घालवाल ?—

**सर्व** : देवाचा कौल माथीं धरला. ( जमिनीवर डोकें टेकून वर उचलून ) एक वचन–एक बाण–रामाची आण–बहिरोबाची आण—

**गुरव** : आतां जाऊं तर लेकरांनो ?

[ गुरव धाड्कन जमिनीवर अंग टाकतो. एकजण त्याच्या डोळ्याला पाणी लावतो. गुरव हळूहळू उठून बसतो, डोळे पुसतो आणि सर्वांकडे पहातो ]

**गुरव** : काय सांगितलं देवानं ?

**पाटील** : काय तें दिसेल आतां—आतां कांहीं बोलायचं नाहीं—आतां कामाला लागायचं—चला आतां—आतां सरळ मुक्कामावर! आधीं जिवाची किरका गांवाबाहेर लावायची. आतां दुसरी बात नाहीं.

[ पडदा. ]

# अंक तिसरा

## प्रवेश १ ला

[ स्थळ–एक रस्ता ]

**पाटील :** झाली फजिती ? तुझ्या देवाचा कौल घेऊन गांवचे एवढे लोक गेले चाल करून, पण काय झालं शेवटीं ? आलांतच ना हात पाठीवर घेऊन ?

**गुरव :** मग काय करायचं तर ! तीं दोन कारटीं काय पिसाळलीं होतीं ! ती एवढीशी पोर मंदा–अन् तो बावळ्या मोती–कुठलं वारं भरलं होतं त्यांच्या आंगांत ?–एकएक कांब घेऊन लागलीं फिरवायला दोघंहीं, तेव्हां पांगापांग झाली सर्वांची—

**पाटील :** अन् त्या जिवानं काय केलं ?

**गुरव :** काय केलं ते बघायला कां थांबला नाहींत ? कां पळालांत ?

**पाटील :** पण काय केलं तें तर सांगशील ?

**गुरव :** घट्ट उभा राहिला होता पुरलेल्या खुंटासारखा ! चौघांनीं चोहींकडून ओढलं, पण हालला नाहीं एक तसूभरसुद्धां ! हात तर उचललाच नाहीं त्यानं, पण हूं की चूं सुद्धां केलं नाहीं.

**पाटील :** आणि तरीसुद्धां तुम्हीं सारे पळालांत ?

**गुरव :** तीं पोरटीं पिसाळली होतीं ना दोन ? त्यांनीं अशी हुल्लड उठवली–

**पाटील :** कीं, पळालांत तुम्ही सारे जण ? वारे शूर ! वारे मर्द !

**गुरव :** पण या माझ्या टाळक्याचं काय ?

**पाटील :** ( हंसून ) तुला कुणी दिलं हें तांबडं पागोटं ?

**गुरव :** त्या कारटीनं ! तिनं मारली कांब. फिर्याद घ्या माझी–तिच्यावर–त्या मोतीवर–अन् त्या जिवावर सुद्धां—

**पाटील :** ( चिडून ) मला कशाला त्रास देतोस ? जा त्या रुप्या लोहाराकडे.

**गुरव :** हें माझं टाळकं फुटलं—

**पाटील :** मग सांग जाऊन तुझ्या देवाला–नाहींतर सांग तुझ्या रुप्याला. खिशांत हात घातला तुझ्या त्यानं, त्यावेळीं कसं वाटलं ? खुळखुळताहेत ना पैसे खिशांत ? मग जा तिकडल्या इस्पितळांत अन् घे लावून मलमपट्टी !

**गुरव** : माझी फिर्याद आहे तुमच्यावर.

**पाटील** : कसली फिर्याद? अन् कुणावर करणार आहेस फिर्याद? उद्यां मामलेदारांसमोर उभा केला तुला, तर काय सांगणार आहेस तिथं? देवाच्या हुकुमानं गेलों म्हणून सांगणार आहेस? सरकारांत ऐकेल का कोण तुझं? अन् रुपानं तुझी ही मूठ दाबल्याची गोष्ट काढली जिभ्यानं बाहेर, तर काय करणार आहेस?

**गुरव** : साक्षीदार कोण आहे त्याला?

**पाटील** : साक्षीदाराला काय रे तोटा? अशीच कुणाची मूठ दाबली जिवानं तर दहा साक्षीदार उभे राहतील! मग काय करशील?

**गुरव** : मग काय करूं तर?

**पाटील** : आज स्वस्थ बैस. माझं ऐक, गांवांत राहायचं म्हणजे गांवाविरुद्ध राहून चालत नाहीं. जिभ्या लोहाराची मिजास तरी अशी किती दिवस टिकणार आहे? तुझीसुद्धां केव्हां तरी वेळ येईल, तोपर्यंत जरा दमानं घे. थांब-तो बघ जिभ्या येतोय इकडे. आतां तूं जा पाहूं इथनं.

(गुरव एका बाजूनें जातो. जिवा दुसऱ्या बाजूनें येतो.)

**जिवा** : (लवून) रामराम पाटील. (पाटील हंसतो) कां? आश्चर्यसं वाटलं?

**पाटील** : रामराम! नाहीं-तसं नव्हे-पण तुझी तल्लख जीभ आज थंड कशी पडली एकदम?

**जिवा** : (अदबीनें) वेळ वखत असतो-वेळ पाहून वागावं लागतं—

**पाटील** : मी तरी तेंच म्हणतों. हें आधीं कळायला पाहिजे होतं तुला! संसारी माणूस, किती दिवस गुर्मी चालेल? गांवाशीं वैर करून कधीं निभाव लागलाय कुणाचा?

**जिवा** : जाऊं द्या हो पाटील. चूक होतेच आहे माणसाच्या हातून! असं पहा, तुम्ही पैसेवाले आहां, मी लाचार आहें, देवघेवीच्या गोष्टी बोलायला आलों आहें मी

**पाटील** : कसली देवघेव? कांहीं गहाण खरेदी आहे?

**जिवा** : खरेदी आहे—

**पाटील** : काय घेतो आहेस खरेदी ?

**जिवा** : मी कसली करणार खरेदी ? खरेदी करायची असती तर अशी लाचारी कां केली असती ? खरेदी नाहीं–विक्री करायची आहे.

**पाटील** : काय विकणार आहेस ?

**जिवा** : घर विकणार आहें माझं—

**पाटील** : असं ! एकूण गांव सोडून जातोयस तर ! तसा नाहीं तर असा जातोयस ? तेंही खरंच. इतके दिवस वाळींत टाकलेला, दाणागोटासुद्धां मिळत नाहीं, कसं माणसानं जगायचं ? नि मी म्हणतों, तूं तरी एवढी अढी कां धरतोस ? शरण जा ना गांवगंगेला ?

**जिवा** : ते राहूं दे. मी गांव सोडीत नाहीं नि घरही सोडीत नाहीं. घर विकायचंय तें याच अटीवर, घर विकायचं पण सोडायचं नाहीं. मला भाडेकरू म्हणून माझ्या घरांत ठेवायला कबूल असेल त्यालाच घर विकायचं, ही पहिली अट आहे माझी.

**पाटील** : अट ही, तुला घरांत ठेवलं पाहिजे–होय ना !

**जिवा** : हो—काय देणार बोला ?

**पाटील** : ठीक—पांचशें देईन !

**जिवा** : दोन हजार रुपये तरी किंमत होईल आज त्या घराची !–

**पाटील** : गरजेला मोल नसतं जिवबा ! अगदीं डोक्यावरून पाणी म्हणजे साडेपांचशें.

**जिवा** : हजार ?—नाहीं—बरं नऊशें ?

**पाटील** : मला आतां वेळ नाहीं—

**जिवा** : ठीक आहे. जास्त घासाघीस नको, सातशेंवर तोडायचं आहे ? नाहींतरें मी चाललों बामणाकडे.

**पाटील** : ( मोठ्यानें हंसत ) तीनशें देखील द्यायचा नाही तो बामण. महा चिकट आहे तो कुळकर्णी. त्याचं भय मला कशाला दाखवतोस ?

**जिवा** : आतां एकच बात–सातशें द्यायचे आहेत कीं नाहींत ? नाहींत ? मग मी चाललों तर– ( जाऊं लागतो )

**पाटील :** इकडे ये जिवबा. तुला भ्रम आहे बामणाचा पण फजिती होईल तुझी—

**जिवा :** होऊं दे माझी फजिती. या वस्तींतलं घर बामणाला हवंय. त्याला एक दुकान उघडायचंय इथं. तुलाच भ्रम आहे पाटला—हजार रुपये देईल तो मला. बामणाला आणायचा नाहीं इथं, म्हणून तुझ्याकडे आलों. पण माझं घर मिळायचं तुझ्या नशिबीं दिसत नाहीं मी चाललों—( जाऊं लागतो )

**पाटील :** जरा थांब ना जिवबा. चावडीवर जाऊं, जरा गुडगुडी ओढूं—

**जिवा :** पुरे झालं! मी इथं व्यवहाराला आलोंय. यावेळीं तूं सावकार आहेस, मी कुळ आहें. व्यवहार आटोपला म्हणजे ओढूं गुडगुडी. आतां शेवटचं विचारतों, सातशें रुपये देणार आहेस? ( पाटील स्तब्ध रहातो ) एकच बात, होय कीं नाहीं?

**पाटील :** कुळकर्णी इथं दुकान काढणार आहे म्हणालास होय? मग तुला कसं रहातां यईल इथं त्यानं तें घर घेतलं तर?

**जिवा :** ते माझं मी पाहून घेईन—तुझं उत्तर काय तें सांग आधीं—

**पाटील :** बरं बरं—कबूल! केव्हां पाहिजेत पैसे?

**जिवा :** आज-आत्तां!

**पाटील :** एवढं वाडवडलांचं घर, दुसऱ्याच्या हातीं जातंय, याचं कांहींच वाटत नाहीं का तुला?

**जिवा :** काय वाटायचं त्यांत? पूर्वीं इथं कांहींच नव्हतं, मग कुणीतरी घर उभारलं, माझे वाडवडील तें आपलं म्हणूं लागले, मीही आपलं म्हणूं लागलों! कुणाला ठाऊक कुणाचं घर आहे तें! आतां दुसऱ्याचं झालं—पुन्हां कुणी तिसराच घेईल, साफ नांगरून टाकील जागा नि तिसरंच घर उभारील! तुझे माझे भाऊबंद कित्येक वर्षं हा गांव टाकून मुंबईला जाऊन राहिलेयत, रोज त्यांच्या घराच्या भिंती कोसळताहेत, त्याचं वाटतंय का कुणाला कांहीं? मी इथं राहाणार आहें. भाडेकरू म्हणून का होइना—माझ्याच घरांत राहाणार आहे. भाडं द्यावं लागेल मला—पण रहाणार आहें इथं, हे काय थोडं झालं? ( पाटील हंसतो ) हंसतोस कशाला बाबा? कुणा कुणाला हंसूं नये. आजवर मी सर्वांना हंसत होतों.

आज तूं मला हंसतोयस. कुणी सांगावं, उद्यां सारं जग तुला अन् मला–आम्हां दोघांनाही हंसूं लागेल! हें असंच चालायचं बाबा–कुणी कुणाला हसूं नये!–मग काय?

**पाटील :** अशी काय जरुरी आली आहे तुला आज?–असा काय इतका जिवावर उदार झाला आहेस?

**जिवा :** हें पहा पाटला, असल्या भलत्या उचापती करायला जाऊं नकोस. रोख सातशें रुपये द्यायचे असले तर दे, नाहींतर नाहीं म्हण. तुला खात्री नसली तरी मला खात्री आहे बामणाची. इथं बामण येऊन तुझ्या उरावर बसूं नये असं वाटत असलं तर होय म्हण—नाहींतर मी चाललों—

**पाटील :** अगदींच वर्दळीवर आला आहेस तूं जिवबा!

**जिवा :** मी आहें आपला रोखठोक माणूस. लोहाराची जात—एक घाव कीं दोन तुकडे—पटलं तर होय म्हण, नाहींतर नाहीं म्हण.

**पाटील :** आतांच पैसे हवे म्हणतोस तर!

**जिवा :** हो–हो–आत्तांच—या घटकेला.

**पाटील :** ठीक आहे—होऊन जाऊं द्या तुझ्या मनासारखं. किती झालं तरी आपला माणूस आहे. काय?—बरं-बरं–चल तर–( दोघे जातात )

## प्रवेश २ रा

[ शिवा लोहाराचं घर. हे घर थेट जिवाच्याच घरासारखें आहे. मात्र पुढील आंगण त्याच्यापेक्षां जास्त निटनेटकें आहे. भट्टीजवळ शिवा बसला आहे आणि रेणुका भात्याची दोरी ओढीत आहे. भात्या ओढीत असतांना ती एक अभंग म्हणत आहे. शिवा चिमट्यांत तुकडा घेऊन भट्टींत तापवतो आहे. ]

**शिवा :** अगदीं मेटाकुटीला आलाय जीव माझा. आधार नाहीं कुणाचाच अन् दिवस हे असे आलेले. आधार म्हणायला एक रुप्या–पण तुम्ही हा असा हट्ट धरलाय! एकदां साखरपुडा करून टाकला असता—

**रेणुका :** तिकडे लक्ष द्या ना जरा भट्टीकडे. विस्तव कुठंय–चिमटा कुठंय—

**शिवा :** कसला विस्तव नि कसला चिमटा! चिमटा बसलाय पोटाला नि विस्तव लागलाय साऱ्या संसाराला! सारखा धाकधुक करतोय जीव! केव्हां काय प्रसंग येईल—

**रेणुका :** कसला प्रसंग यायचा?

**शिवा :** राहूं दे तो भाऱ्या! तो घण घ्या जरा—(चिमट्यांतला लोखंडाचा तुकडा घणावर ठेवतो आणि रेणुका घण मारूं लागते) मी असं म्हणत होतों, हा हट्ट कां तुमचा? काय झालं रुप्याला मंदा दिली तर?

**रेणुका :** आतां काम करा मुकाट्यानं! कांहींसुद्धां बोलायचं नाहीं मला—

**शिवा :** बोलायचं नाहीं म्हणून कसं चालेल? फास लागलाय माझ्या गळ्याला. परवां जिवाचं तें तसं झालं. रुप्या स्वस्थ बसायचा नाहीं. उद्यां माझ्यावर प्रसंग आला तर—

**रेणुका :** कसला प्रसंग यायचा? देवा गुरवाची चाड धरतां उगीच म्हणूनच ना येतात हे प्रसंग? कसले देव नि कसले गुरव!

**शिवा :** देवा गुरवाचा प्रश्न नाहीं इथं—ही बाब आहे वेगळीच!–रुप्याला दुखावून चालायचं नाहीं वहिनी.

**रेणुका :** तर काय करणार? वचन मोडणार? मरणाऱ्या भावाला दिलेलं वचन मोडणार? मोती काय वाईट आहे? दरिद्री आहे–मला कबूल आहे–पण आपण तरी असे कुठं गबर आहोंत? गरिबाच्या घरीं कुणी पोरगी दिली नसती तर आज गरिबांचीं घरं ओस पडलीं असतीं! पण गरिबांचे संसार चालू आहेत ना अजून?

**शिवा :** रुप्याच्या घरांत पडली पोर तर सुखाला लागेल!

**रेणुका :** खात्री आहे तुमची?

**शिवा :** कुणाच्या नशिबाची कुणि खात्री द्यायची? असं पहा वहिनी, आपण आपलं बरं म्हणून करावं, पुढं ज्याचं नशिब त्याच्याबरोबर!

**रेणुका :** पण मी असं विचारतें, मुळांतच अशीं हें बरं आहे का?

**शिवा :** टेकीस आलीं माणसं आपण–संसाराला हातभार लागेल रुप्याचा–

**रेणुका :** संसाराच्या काळजीसाठीं मुलीची भाड का खाणार आहांत?

**शिवा** : जादा बातींचं काम नाहीं वहिनी ! मी असलं कांहीं ऐकून घेणार नाहीं. इथला मालक आहें मी—

( आंतून 'शिवा लोहार' अशी हांक ऐकूं येते. शिवा दचकतो, त्यांच्या हातांतला चिमटा गळून पडतो. हातांत घण घेऊन रेणुका तशीच उभी रहाते. बेलीफाला घेऊन रुपा येतो. )

**बेलीफ** : शिवा लोहार—

**शिवा** : ( ताड्कन उठून ) काय आहे रुपाजीराव ?

**रुपा** : जप्ती वॉरंट ! मला खात्री नाहीं तुझी. तूं पळून जाशील असं वाटलं म्हणून मुद्दाम कोर्टाकडून मी जप्ती वॉरंट मिळवलं—

**शिवा** : कसलं ?

**रुपा** : हें घर ताब्यांत घ्यायचं ! पैसे घेतलेयस ना माझ्याकडून ? तारण ठेवलंस ना हें घर ? ते साडेसहाशें आत्तांच्या आत्तां हजर कर, नाहींतर घर खालीं कर.

**शिवा** : ( मट्कन घडवंचीवर बसून ) कुठून आणूं रुपये ? साडेसहाशें ! कुठून आणूं साडेसहाशें ? साडेसहाशें पया सुद्धां नाहींत माझ्याजवळ !

**रेणुका** : साडेसहाशें ! एवढं का कर्ज झालंय आपल्याला ?

**शिवा** : होय ! साडेसहाशें ! साडेसहाशें !

**रेणुका** : तुमचं काय म्हणणं आहे रुपाजीराव ?

**रुपा** : माझं काम आहे शिवबाकडे. या सरकारी कामांत बायकांचा कांहीं संबंध नाहीं ! समजलं ?—हं शिवबा, बोला—रक्कम तयार आहे कीं घराचा ताबा घेऊं ? हं ! झटपट आटपा. खोळंबा होतोय सरकारी माणसांचा.

**शिवा** : *आतां हे पैसे मिळाले नाहींत तर तुम्ही हें सगळं ताब्यांत घेणार ?*

**रुपा** : हो !

**शिवा** : नि मला घराबाहेर काढणार ?

**रुपा** : हो !

**शिवा** : *नि हिला ? या माझ्या वहिनीला ?*

**रुपा :** हो-हो-! सर्वांना घराबाहेर काढणार!

**शिवा :** बरं झालं-मंदा बाहेर गेलीय ती!

**रुपा :** कुठं गेलीय?

**रेणुका :** ( कडाडून ) तुला काय करायचंय त्याच्याशीं? घराबाहेर काढणार आहेस ना आम्हांला? ती आधींच गेलीय बाहेर. तिला नको आणखी घराबाहेर काढायला! उठा भाऊजी, चला!

**शिवा :** ( टकमक इकडे तिकडे पहात ) कुठं?

**रेणुका :** जिथं वाट फुटेल तिथं! चला. उठा लौकर! पुरुषासारखे पुरुष तुम्हीं-एवढ्या ह्यानं खचून जातां? काय कुणाचीं घरंदारं गेलीं नाहींत? किती लोक भिक्षा मागताहेत रस्तोरस्तीं, त्यांतलेच आम्हीं! कुणाला बुडवलं नाहीं-कुणाला फसवलं नाहीं—कुणाचा गळा कापला नाहीं कीं चैनी चंगेलीसाठीं पैसेही उधळले नाहींत! धंदा बसला त्यापायीं दळिद्र आलं—तिथं कसली कुणाची लाज बाळगायची? घे म्हणावं सारं उरावर! एक सुतळीचा तोडा-सुद्धां नको यांतला आम्हांला! चला-उठा!

[ रेणुका शिवाच्या हाताला धरून त्याला उठवते आणि दोघेंही बाहेर जाऊं लागतात. रेणुका ताड्कन पुढें जात आहे. शिवा हळुहळु पावलें टाकीत आहे. ]

**रुपा :** थांबा!

**शिवा :** ( थांबून मागें पाहून ) कांहीं उपाय आहे का?

**रुपा :** हो-आहे!—पण तुम्हाला पटला पाहिजे. मला मंदा द्यायचं कबूल करा-आजच्या आज साखरपुडा करा—

**रेणुका :** ( जात असतांना एकदम थांबून वळून ) काय ऐकतां त्याचं?—चला लौकर.

**शिवा :** ( घुटमळून थांबत ) मला कबूल आहे—

**रेणुका :** पण मला कबूल नाहीं—

**रुपा :** काय शिवबा, कुणाचं म्हणणं ऐकायचं?

**शिवा** : ( उसनें अवसान आणून ) माझं ! मी तिचा पालक आहें—मी कबूली देतोंय.

**रेणुका** : मुलगी माझी आहे—मी कबुली देणार नाहीं.

**शिवा** : पालक मी आहें—मला कबूल आहे. जा तिला घेऊन या आत्तांच्या आत्तांच.

**रेणुका** : नामर्दासारखे नांगी काय टाकतां ? घर गेलं तर बलाय गेली ! अशी काय इस्टेट लागून राहिलीय ? या मोडक्या पडक्या घरापायीं काय पोरीच्या जन्माचं मातेरं करायचं ?

**शिवा** : तुम्हाला नसेल किंमत घरादाराची-पण मला आहे. वाडवडलांचं नांव नाहींसं का करून टाकायचंय ?

**रुपा** : अगदीं बरोबर ! बायकांना काय होय वाडवडिलांची अब्रू ? किती झालं तरीं दुसऱ्या घरचीं माणसं-त्यांना अभिमान असतो तो आपल्या माहेरचा.

**रेणुका** : दोहोंचाहीं ! आधीं सासरचा, मग माहेरचा ! रुपाजीराव, मला इथं कांहींच का अधिकार नाहीं ?

**शिवा** : नाहीं,-नाहीं,-नाहीं ! विधवा म्हणजे अन्नवस्त्राची मालकीण ! तुम्हांला घर नको असेल तर तुम्ही वाटेल तिकडे जा. आज मंदेचा साखरपुडा मी करणार !

**रुपा** : ऐकलंत रेणुकाबाई—नव्हे सासूबाई !

**जिवा** : ( आंतून बोलत बाहेर येत ) हो-हो-मी देखील ऐकलं बरं रुपाजीराव—

**रुपा** : इथं तुमचं काय काम ?

**जिवा** : ( हंसत ) काम नाहीं कसं ? मामा आहें ना मी मुलीचा ? बोहल्यावर मुलगी उचलून आणून ठेवायची असते ती मामानंच ना ?

**रुपा** : मग तुमची कबूली आहे तर ?

**जिवा** : हो-हो ! माझीसुद्धां कबूली आहे—

**रुपा** : ऐका सासूबाई !—

**जिवा :** अरे, पण कबुली कसली तें नाहीं विचारलंस ?

**रुपा :** ( चिचकून ) कसली ?

**जिवा :** कबुली ही-तुझ्या पेंकाटांत लाथ मारून तुला इथून बाहेर काढायला कबुली आहे माझी.

**रेणुका :** ( एकदम जिवापाशीं येऊन ) तुला माहित नाहीं दादा,—

**जिवा :** मला सारं कांहीं माहित आहे !

**रुपा :** काय माहित आहे ? हे बेलीफ पाहिलेत ? घराचा ताबा घ्यायला आलोंय मी. वॉरंट मिळालेंय कोर्टाचं-जप्ती वॉरंट आहे.

**जिवा :** अरे असलीं ढीग वारंटं बघितलीं आहेत मी ! तें वारंट घेऊन पाण्यांत घालून कोळून पी-जा !

**शिवा :** बस् ! पुरे झालं ! जिवा, इथं आमच्या कारभारांत तोंड घालायची तुला जरुरी नाहीं. रुपाजीराव, मी कबुली दिलीय—

**जिवा :** अरे थांब जरा,—

**रेणुका :** प्रसंग काय आहे याची तुला कल्पना तरी आहे का दादा ?

**जिवा :** ( हंसत हंसत ) किती रुपये आहेत रे रुप्या ?

**रुपा :** कां ? देणार आहेस ? कधीं एवढा श्रीमंत झालास ! कुठं मारलास डल्ला ?

**जिवा :** ( रुपाच्या पाठीवर थाप मारून ) अरे सांग तर खरं ?

**रुपा :** साडे सहाशें रुपये ! ऐकलंस ! साडे सहाशें ! चवल्या, पावल्या, खुर्दा नव्हे ! कोर्टाची डिक्री मिळाली आहे साडेसहाशांची !

**जिवा :** बस ! एवढेच ?

**रुपा :** एवढेच ! मग किती पाहिजे होते ? साडेसहा हजार ? साडेसहा रुपये तरी आहेत का खिशांत ?

**जिवा :** ( खिशांतलें नोटाचें पुडकें काढून बेलीफाच्या अंगावर फेंकीत ) हे घे ! नीट मोजून घ्या बेलीफसाहेब, अन् चला मला पावती द्या लिहून. ( बेलीफाचा हात धरून त्याला घेऊन जातो )

**रेणुका :** दादा, दादा ! थांब ना जरा—( शिवाला ) झालं ? फिटलं ना देणं ? ( रुपाला ) आतां थांबलास कशाला ? हो पाहूं चालता इथून—( शिवाला ) चला आतां घरांत. ( शिवा दगडाच्या पुतळीसारखा सुन्न होऊन उभा आहे. रुपा तसाच सुन्न होऊन पहात राहिला आहे. इतक्यांत पाटील आणि मोती येतात. )

**मोती :** माझे बाबा आले होते इथं ? ( कुणी उत्तर देत नाहीं ) बाबा आले होते इथं आत्या ?

**रेणुका :** ( सुन्नपणें ) हो !–आला होता !–आतां गेला तो !

**पाटील :** काय झालंय ? जिवा आला होता इथं ? काय हो रुपाजीराव, बोलतसे नाहीं तुम्हीं ? जिवा आला होता इथं ? हो ? कशाला ?

**रुपा :** ( संथपणें पुढें येऊन पाटलाचा हात धरून ) खरं सांगा पाटील, तुम्हांला माहीत असलं पाहिजे— कुठून आणली एवढी रक्कम जिवानं ?

**पाटील :** केवढी रक्कम ?

**रुपा :** साडे सहाशें रुपये ! जप्ती वारंट आणलं होतं मी शिवावर आज—कुठून आणले माहित आहेत ?

**पाटील :** अस्सं ! आतां कळलं !

**शिवा :** काय कळलं ?

**पाटील :** म्हणूनच त्यानं घर विकलं तर !

**रुपा :** कुणी ? जिवानं ? जिवानं घर विकलं आपलं ? कुणाला ?

**पाटील :** मला–सातशें रुपयांना ! पन्नास रुपये स्वतःसाठीं ठेवले वाटतं त्यानं ?

**रुपा :** अस्सं ! तुम्हाला विकलं घर ! ठीक आहे—चला पाटील.

**पाटील :** कुठं ?

**रुपा :** चला म्हणतों ना ! फायद्याचं कलम आहे ! चला—( पाटलाचा हात धरून ओढून घेऊन जातो )

**जिवा :** ( घडवंचीवर खालीं बसतो अन् दोन्हीं हातांनीं डोकें धरतो ) माझ्यासाठीं जिवानं आपलं घर विकलं !—माझ्यासाठीं !—( रेणुकेकडे

एकदम वळून ) नाहीं —तुमच्यासाठीं,—आपल्या बहिणीसाठीं—माझ्यासाठीं नव्हे—तुम्हां मायलेकींसाठीं—( रेणुका स्तब्ध उभी आहे )

**मोती** : ( टाळी वाजवून ) तरीच बरं का आत्या—नोटाचं पुडकं घेऊन बाबा आला तेव्हां मी विचारलं त्याला, तर काय म्हणाला माहित आहे ?—शिलगणासाठीं सोनं आणलंय म्हणाला—लुटवायला ! हें असं शिलंगण केलं बाबानं अं !

**रेणुका** : ( सुन्नपणें आपल्याशींच ) आतां हें घर दादाचं !—दादाचं—आमचं नाहीं—( ताड्कन शिवाजवळ जाऊन ) काय हो, आतां हें घर कुणाचं ? दांतखिळ कां बसली ? कुणाचं घर हें ?

**जिवा** : ( आंत येत येत ) तुझंच ग बाइ हें घर-तुझंच घर !—म्हणजे शिवाचं-मालक आहे ना हा या घराचा ! (खिशातली पावती काढून शिवाच्या हातीं कोंबीत ) ही घे पावती—आतां रुप्याचं कांहीं सुद्धां लागत नाहीं तुम्हीं लोक-( एकदम जातो )

[ शिवा पावती हातीं घेऊन रेणुकेकडे नुसता डोळे तारवटून पहात राहतो ]

**मोती** : काय विचित्र आहे हा माझा बाप ! आयतं घर ताब्यांत आलेलं—आपलं घर विकून टाकलं त्याची आठवणच नाहीं !

**रेणुका** : ( हळुहळु पुढें येऊन शिवाला ) ऐकलंत ? प्रकाश पडला का कांहीं डोक्यांत ? त्यानं आपलं घर विकल-आमचं घर आम्हाला दिलं-त्याला घर नाहीं आतां !—ऐकूं येतंय का तुम्हांला ? काय करणार आहां आतां ?

**मोती** : ( हुरळून ) आमचं लग्न—

**शिवा** : नाहीं—मुळीच नाहीं-प्राण गेला तरी नाहीं ! जिवाचे माझ्यावर उपकार झाले आहेत-फार उपकार झाले आहेत-मी नाहीं म्हणत नाहीं-पण गांवच्या देवाला जो मानीत नाहीं त्याच्या घरांत प्राण गेला तरी मी माझी मुलगी द्यायचा नाहीं.

**मोती** : ऐक आत्या ! अन् मीहीं सांगतों तें ऐक-मी सुद्धां माझ्या बापाचाच बेटा आहें-उपकाराच्या मोलानं तुझी मुलगी नको आहे माझी बायको

व्हायला! समजलं? जातों मी! मंदेला म्हणावं यापुढं केव्हाही माझ्यासमोर येऊं नको! आमच्या घरीं पाऊल टाकूं नको असं म्हटलं असतं–पण आमचं घर आहे कीं नाहीं याचीच खात्री नाहीं मला! ( जातो )

[ क्षणभर स्तब्धता. रेणुका हळुहळु शिवाजवळ जाऊन उभी रहाते ]

**रेणुका :** कांहीं माणुसकी म्हणून आहे का तुम्हांला? निदान तो जाईपर्यंत तरी थांबायचं होतं! त्याच्यासमोर बोललांत? अगदीं लाजलज्जा सोडून बोललांत? आपलं असेल नसेल तेवढं ज्यानं विकून टाकलं तुमच्यापायीं, त्याच्या मुलासमोर बोललांत? तुमच्या संकटाला धांवून येणाऱ्या त्या चालत्या—बोलत्या जिवंत माणसापेक्षां गांवच्या देवळांतला तो दगडी देव ज्यास्त वाटला तुम्हांला? मन म्हणून कांहीं आहे कीं नाहीं? उपकाराची कांहीं जाणीवसुद्धा नाहीं! अन् आतां कुणाला देणार आहांत मुलगी? रुप्याला?

**शिवा :** गांवच्या महाराला देईन—पण या बेरडाच्या घरीं नाहीं घालणार मुलगी! देवानं वचन घेतलंय माझ्याकडून! उपकाराच्या पकडींत धरून मला बनवायला पहातो होय?–मी धूप घालतों त्याच्या उपकारांवर! प्राण गेला तरी मी देवाचं वचन मोडणार नाहीं—( ताड्कन उठून घरात जातो )

**रेणुका :** जगांत देव म्हणून कुणी नाहीं हेंच खरं! [ पडदा ]

## प्रवेश तिसरा

[ गांवातला एक रस्ता. गोपाळ आणि मंदा बोलत येत आहेत. ]

**गोपाळ :** आतां कांहीं काळजी करायला नको. जिवा गेला आहे तिकडे. आतां सारं कांहीं ठाकठीक झालं असेल. आतां शिवा कायमचा सुटला रुप्याच्या तडाख्यांतून. यावेळी तूं उगीच आलीस माझ्याकडे. तिथं असतीस म्हणजे कळलं असतं तुला.

**मंदा :** कसं वेड लागायला आलं होतं मला! काका सारखे साखरपुडा करायच्या गोष्टी बोलत होते–जीव घाबरा झाला होता माझा. आधार कुणाचा आहे दुसरा? जिवामामाकडे जावं म्हटलं तर तो वसकन अंगावर येतो—तुमच्याखेरीज दुसऱ्या कुणाकडे जाऊं?

**गोपाळ** : आतां कांहींसुद्धां राहिली नाहीं भीति—आतां सरळ घरीं जा. सारं कांहीं ठाकठीक झालंय असं दिसून येईल तुला. मी आलों असतों तुझ्या-बरोबर—पण तें बरं दिसत नाहीं. कांहीं भिऊं नको. सरळ घरीं जा—थांब, हा मोती येतोय तिकडूनच—( मोती येतो पण न पाहिलेंसें करून पुढें जाऊं लागतो ) अरे कुठं चाललास मोती ?—थांब ना. असा काय वाघ लागलाय तुझ्या पाठिशीं ? थांब म्हणतों ना !

**मोती** : ( दुरूनच ) मी घरीं चाललोंय. घरीं ! आतां तें घर कांहीं आमचं नाहीं—तसं म्हणायचं म्हणजे माझ्या बापाकडे चाललोंय मी.—

**गोपाळ** : तें माहित आहे मला. पाहिलंस ना ? ही मंदा आहे इथं !

**मोती** : माझे डोळे कांहीं फुटले नाहीत !

**गोपाळ** : काय झालंय ? भांडलांत का ग तुम्हीं दोघं मंदे ? काय झालंय रे ?

**मोती** : तें तिच्या काकाला विचारा.

**गोपाळ** : तिकडेच गेला होतास ना तूं ?

**मोती** : हो ! अन् चांगले जोडे खाऊन आलों तिकडून !

**गोपाळ** : म्हणजे ? जप्ती उठली ना ?

**मोती** : तें सारं होऊन गेलं. रुप्या गेला काळं तोंड करून चुरमुरे खात—

**गोपाळ** : मग तुझं कुठं बिघडलं ? आनंदाची गोष्ट—ही इकडे तळमळत होती—आनंदाची गोष्ट तिला मजेमजेंत सांगून टाकायची तो असा चिडल्यासारखा कुठं निघालास ?

**मोती** : आनंदाची गोष्ट खरी—पण तो आनंद तिच्या काकाचा. आमचं घर गेलंच आहे—हिचं घर राहिलं. त्याला आतां भीति नाहीं—

**गोपाळ** : म्हणून तुला वाईट वाटतंय होय !

**मोती** : मला वाईट वाटतंय!—हो—मला वाईट वाटतंय.—पण तें कां ? एवढ होऊनसुद्धां हिच्या काकांनं जोडा मारला आम्हांला म्हणून वाईट वाटतंय ! देवान वचन घेतलंय ना त्याच्याकडून ?

**गोपाळ** : कुठल्या देवानं ?

**मोती** : गांवच्या देवानं—गुरवाच्या देवानं—रुप्याच्या अन् पाटलाच्या देवानं—

**मंदा :** मोती !

**मोती :** बोलूं नकोस ! तुझा आमचा कांहीं संबंध नाहीं. देवाचा कोप होईल माझ्याशीं बोललीस तर !

**गोपाळ :** हें कांहीं न्यारंच गाणं दिसतं !

**मोती :** हो ! हें न्यारंच आहे गाणं ! तुम्हांला नाहीं कळायचं तें. आम्हाला बंदी केलीय हिच्या काकानं—

**गोपाळ :** एवढं झाल्यावरसुद्धां ?

**मोती :** हो हो ! एवढं झाल्यावरसुद्धां ! एवढं झालं म्हणूनच आतां घर मिळालं ना त्याचं त्याला ?—

**गोपाळ :** असं पहा मोती, डोकं जरा थंड कर आणि मला सरळ सरळ सांग—काय झालंय ?

**मोती :** हिचा काका म्हणाला, गांवच्या देवाला जो मानीत नाहीं त्याच्या घरांत प्राण गेला तरी मी मुलगी द्यायचा नाहीं. हंः ! उपकाराचीसुद्धां जाणीव नाहीं ! ही काय माणुसकी झाली ?

**गोपाळ :** एवढंच ना ? अरे आतां कोण विचारतोय शिवा लोहाराला तुमचीं तुम्हीं खंबीर असलांत, कीं शिवा लोहाराचं कांहींसुद्धां चालायचं नाहीं हिची आई नाहीं ना तसं म्हणत ? मग झाल तर ! तो कोण नाहीं म्हणणारा असं पहा मोती, शिवाचा राग हिच्यावर कां काढतोस उगीच ? हिनं काय केलंय ?—असं पहा मंदे, आतां तूंच याची समजूत घाल. आम्हां म्हाताऱ्यांचं कामं नव्हत हीं. माझी अडचण कशाला उगीच ? ( जातो )

( दोघेहीं एकमेकाकडे न पाहतां क्षणभर स्तब्ध असतात )

**मंदा :** मोती !–( जरा थांबून ) मोती !

**मोती :** हूं !

**मंदा :** हें जिवामामाचं ‘ हूं ’ घेतलंस वाटतं तूं ?

**मोती :** हूं !

**मंदा :** गोपूकाकानीं काय सांगितलं ?–(जरा थांबून) बोलायचं नाहीं वाटतं

**मोती :** मी सांगितलंय ना तुझ्या आईला—तूं समोर येऊं नकोस म्हणून ?

**मंदा** : मग तूं ये समोर ! ( जरा थांबून ) मोती—

**मोती** : काय मदा ?

**मंदा** : गेला राग ?

**मोती** : नाहीं अजून !

**मंदा** : मग केव्हां जाणार हा राग ?

**मोती** : तें मला काय ठाऊक ?—मोठ्या खुषींत येऊन गेलों होतों मी-पण तुझ्या काकानं तें तसं केलं-कृतघ्न बेटा !

**मंदा** : पण मी कृतघ्न आहे का ? माझी आई तसं कांहीं म्हणाली का ? केवढं संकट आलं होत आज—आपलं घर विकून जिवामामानं आमची लाज राखली. काकाला नसेल वाटत त्याचं चोज-पण मी म्हणतें—( दोन्हीं हातांनीं त्याला पकडून धरून )—इकडे पहा ना मोती-आतां हांस ना जरासा-हांस-हांस पाहूं एकदां ( तिच्या प्रत्येक वाक्यासरशीं त्याचा राग ओसरत जाऊन चेहरा हंसतमुख होतो ) हंसला रे हंसला !

( दोघेंहीं हंसत हंसत एकमेकांच्या हातांत हात घालून हंसण्याच्या उकळ्यां-वर उकळ्या आणूं लागतात. मदा गाऊं लागते )

**हंसऱ्या या रायाचा राग विरला । कीं जिव**
**लाडका जवळि आला ॥ कोण्या चिंतेनें कळवळला ।**
**कीं हळुवार मिठी घाली मजला ॥ धृ ॥ एक मनिचा**
**भाव सखया जावें राउळाला । हृदयचोरटा शाम**
**सांवळा माझा नाथ झाला ॥ मेल्या जगाचि लाज**
**कशाला ? । कीं तुडविन साऱ्या ग जगताला ॥ १ ॥**

( दोघेंही गात गात निघून जातात )

## प्रवेश ४ था

[ जिवाचें घर. जिवा एकटाच भट्टीजवळ बसला आहे हातांत चिमटा घेऊन विझलेली भट्टी उगीच उकरीत आहे. इतक्यांत रेणुका येते. तो तिच्याकडे पहात नाहीं. ती येऊन त्याच्याजवळ उभी राहाते ]

**रेणुका** : दादा !

**जिवा** : ( तिच्याकडे न पाहतां ) हूं !

**रेणुका** : मी आलें आहें—

**जिवा** : कशाला आली आहेस ? मला धन्यवाद द्यायला ? कांहीं अडलं नव्हतं त्याच्यावांचून !

**रेणुका** : दादा ! आतां मंदेचं काय करायचं ?

**जिवा** : तें मला काय विचारतेस ? मी कांहीं तिचा पालक नाहीं—

**रेणुका** : आतां साऱ्या वावटळी विझल्याहेत—आतां घे ना तिला एकदा आपल्या घरांत !

**जिवा** : कशाला ? ही माझी भट्टी बंद पडलीय, गांवातला दुकानदार डाळ—तांदुळसुद्धां देत नाहीं मला, माझ्याच घरांत मी भाडेकरू म्हणून राहिलोंय, अन्नाची भ्रांत, खविसासारखे दोघेच बापलेक इथं वावरतों आहोंत, त्या या मसनवटींत का आणून टाकणार आहेस तुझी पोरगी ?—हें बरं नव्हे रेणू ! दीराच्या परवानगीनं तूं आली असशील असं नाहीं मला वाटत !

**रेणुका** : भाऊजींच्या परवानगीनंच आलेंय मी. मला बोलायचंय दादा—पण रागावणार नाहींस ना ?

**जिवा** : कोण पर्वा करतोय माझ्या रागाची ? वारा वाहतोय, वादळ उठतंय, विजा चमकताहेत, पाऊस कोसळतोय, कोण पर्वा करतोय त्याची ! तसाच माझा राग ! कुणी हंसतात, कुणी छत्री आड करतात, कुणी म्हणतात बडबडतोय वेडा !—जग चाललंय आपल्या मार्गानं अन् इकडे मी गुरगुरतोंय आपल्याशींच ! कोण पर्वा करतंय माझी ?—काय सांगायचंय तुला ?

**रेणुका** : बाबांच्या हट्टानं माझ्या आयुष्याचं मातेरं झालं—तसं मंदेचं व्हायला नको !—त्यावेळीं तूं भाडलास बाबांबरोबर—

**जिवा** : तेव्हां मी फारच भडक होतों नाहीं रेणु ?

**रेणुका** : आतां कुठं कमी आहेस ?

**जिवा** : त्यावेळीं कुणी माझं ऐकत नव्हतं–नि आतांही कुणी ऐकत नाहींत–

**रेणुका :** अन् तूहीं कुणाचं ऐकत नाहींस! मी कुणाच्या तोंडाकडे पाहूं? प्रसंगी धांवून आलास—हं हं! थांब—मी उपकार मानीत नाहीं तुझे. गेलेलं घरदार राहिलं-पण मी ही अशी विधवा-तुझंही घर उघडं पडलेलं—

**जिवा :** माझं घर!

**रेणुका :** तें मी विसरलें नाहीं दादा! तुझं घर आतां तुझंच नसलं तरी छप्पर आहे डोक्यावर! मुलगा आहे ना तुझा घरांत? किती दिवस त्याला चूल फुंकायला लावणार तूं? सारा जन्म मी दुःखांत काढला, आतां मुलांचं सुख पाहून तरी सुखी व्हायला देणार नाहींस का मला?

**जिवा :** आतां पूर्वरंग बंद कर आणि चट्कन् कथेवर ये पाहूं!

**रेणुका :** मुलांच्या कल्याणासाठीं आम्ही वडील माणसांनीं थोडी झीज नको का सोसायला?

**जिवा :** हूं!

**रेणुका :** या तुझ्या 'हूं'ची चीड येते सर्वांना!

**जिवा :** अन् मला चीड येते तुझ्या अर्धवट बोलण्याची.—उगीच लांबण कशाला लावतेयस?

**रेणुका :** मग सरळच सांगतें—भाऊजींचं म्हणणं आहे, तूं जातीची माफी मागावी, जातगंगेला दंड द्यावा, गांवच्या देवळांत जाऊन नाक घासावं, क्षमा मागावी, तरच मंदेचं मोतीशीं लग्न होईल! ( जिवा मोठमोठ्यानें हंसतो ) ही हंसण्याजोगी गोष्ट आहे का दादा!

**जिवा :** तुझ्या दृष्टीनं नसेल, पण माझ्या दृष्टीनं आहे. हीच का माझी परीक्षा केलीस? शिवा म्हणतो नि तूं ऐकतेस! आज मी देवळांत गेलों, नाक घासलं, घरांत देव आणले, त्यांची पूजा करायचं ढोंग केलं—मीच नको कांहीं पूजा करायला, बायको हवी आहे म्हणून मोतीच करील पूजा—नि एकदां लग्न उरकून घेतल्यावर मी ते देव उकिरड्यावर फेंकून दिले तर कोण काय करणार आहे माझं? मग कांहीं मंदा मोतीचं लग्न मोडतां यायचं नाहीं! थांब—जरा ऐकून घे त्यांच्या कल्याणासाठीं असंही कर म्हणून तूं म्हणशील—पण फसवणुकीनं कधीं कल्याण झालंय का कुणाचं? झीज सोसायला देखील मर्यादा

आहे. पेटलेल्या भट्टींत हात घालायला सांग मला, हूं कीं चूं न करतां मी जळते निखारे हातीं घेऊन दाखवीन. हात भाजला तर उद्या मलम लावून बरा होईल, पण मन भाजलं तर तें मुर्दाड होतं. माझ्या मनाचं सरण रचायचं नाहीं मला!—शिवाच्यापुढं नाक घांसायला सांग मला, दहा वेळ नाक घाशीन मी त्याच्या-पुढं! हाडामासाचा चालता बोलता माणूस आहे तो—चालता बोलता देव आहे तो!—पण गांवकीच्या नांवाखालीं कुठल्यातरी पत्थरापुढं मान वांकवायला सांगितलीस मला, तर तें व्हायच नाहीं माझ्या हातून! त्यापायीं माझा जीव गेला तरी चालेल तिथं मंदामोतीच्या सुखाची कसली चाड! जगांतले चार लोक रडताहेत तसेच तुम्हीही रडा घटकाभर! माझ्या खोटेपणाच्या पायावर त्यांच्या संसाराची इमारत उभारली तर ती केव्हां कोलमडून पडेल त्याचा नेम नाहीं! ऐकलंस रेणू, हें आभाळ कोसळून पडलं तरीसुद्धां हा जिवा लोहार आपल्या तत्वाशीं बेइमान होणार नाहीं—(क्षणभर थांबून एकदम रेणुकेकडे पाहून) गेली नाहींस अजून?

**रेणुका**: कशी जाऊं दादा? आईचं काळीज आहे हें! दोघांची आई आहे मी! दोघांच्या सुखापायीं जीव गुतलाय माझा, म्हणूनच ना तुझी करुणा भाकायला आलें?

**जिवा**: कितीही करुणा भाकली तरी तो दगडी देव जसा प्रसन्न होत नाहीं तसाच मीही आहें म्हणून समज (क्षणभर थांबून) शिवाची समजूत घालायचा प्रयत्न मी केला असतां, पण तो श्रद्धाळू माणूस आहे. त्याची श्रद्धा त्याच्यापरीन माझ्याइतकीच कठोर आहे. माझा एक शब्द सुद्धां ऐकणार नाहीं तो!—कशाला थांबलीस उगीच? जें व्हायचं असेल तें होईल. त्या पोरांचं भवितव्य तुझ्या हातीं नाहीं कीं माझ्याही हातीं नाहीं! जा आतां. (रुपा, पाटील आणि बेलीफ येतात. त्यांच्या मागोमाग मंदा आणि मोती येतात)

**जिवा**: इथं तुझं काय काम आहे रे रुप्या?

**रुपा**: मी ताबा घ्यायला आलोंय!

**जिवा**: कसला ताबा?

**रुपा** : या घराचा ताबा घ्यायला आलोंय मी. हें घर माझं आहे. पाटला-कडून मी विकत घेतलंय. मोकळया घराचा ताबा घ्यायचाय मला !

**जिवा** : मोती,—चल ! ( मोती स्वस्थ रहातो ) चल मोती ! आतां इथं कांहीं नाहीं आपलं !

**रुपा** : जरा थांब.—याला एक उपाय आहे—खरेदीखतमुद्दां फाडून टाकतों हवं तर—

**जिवा** : ( न पाहतां ) कळलं !—चल मोती !

**पाटील** : माझा नाईलाज झाला जिवबा. एकदां विक्री केल्यावर भाड्याची अट मानतो कोण ?—

**जिवा** : तें मी विचारलं का तुला ? चल मोती ! ( मोती रेणुकेपाशीं जाऊन उभा रहातो. )

**रुपा** : भावाचं घर राखणं आतां तुमच्या हातीं आहे रेणुकाबाई.

**रेणुका** : असा डाव टाकतोस होय ? नाक दाबून तोंड उघडायला पाहातोस ? भावाचं घरं राखण्यासाठीं काय मी माझ्या मुलीला सैतानाच्या घरांत घालूं ? त्यापेक्षां माझ्या हातानं गळा दाबून तिचा जीव घेईन. तशी मरायची ती अशी मारलेली काय वाईट ?—

**जिवा** : मोलाचे शब्द कशाला खर्ची घालतेस रेणू ? जा ना आतां आपल्या घरीं ! चल रे मोती.

**रेणुका** : ( चवताळून रुपाच्या अंगावर जात ) तुला काय वाटलं रे माकडा ? माझी मुलगी म्हणजे कोण वाटली रे तुला ? तशीच वेळ आली तर मुरळी म्हणून वाहीन खंडोबाला, पण तुझा हात लागूं द्यायची नाहीं तिला ! कसलं आलंय घर ! आग लागेना या घराला नि भडका होइना का या साऱ्या संसाराचा ! हें घर घे-तें घर घे-नि कर आम्हांला मोकळे !

**रुपा** : ( शांतपणें ) असा अविचार करूं नका रेणुकाबाई. एवढीशीं गोष्ट, तिच्यासाठीं एवढा हट्ट कशाला ?

**जिवा** : ( पुढें येऊन ) आतां पुरे कर रुप्या. बाबारे, पैशानं सारं कांहीं मिळतं असं पैसेवाल्या माणसाला वाटतं ! खरं आहे तें ! पण कांहीं माणसं

अशीं आहेत, तीं पैशानं मिळत नाहीत.—ती विकत घेतां येत नाहींत. मोठीं माजोरी असतात तीं माणसं.—जगाची उलाढाल करणारा पैसा खिजगणतींत नसतो त्यांच्या. पैशाच्या आवाजापेक्षां अंतरींच्या मुक्या बोलाला जास्त किंमत देतात तीं माणसं. तत्वाचा फार दिमाख असतो त्या माणसांना! ( रेणुकेला जवळ घेऊन ) तसलीं आहोंत आम्हीं हीं बहिणभावंडं! ही आपल्या पोरीसाठीं मरतेय—मी आपल्या तत्वासाठीं मरतोंय. अन् शाबास आहे तुझी देखील! एवढे फटके बसताहेत तरीमुद्धां नव्या नव्या क्लृप्त्या शोधून काढतोयस! मोठं अजब आहे तुझं डोकं. अन् त्याहीपेक्षां भारीच अजब आहे तुझी चिकाटी! गांवाच्या कल्याणासाठीं एवढी चिकाटी दाखवली असतीस-( एकदम वळून ) चल मोती!

**रेणुका :** पण घरांतली चीजवस्त ?—

**जिवा :** एवढं घर गेलं तिथं या अडगळीची काय पर्वा! राहूं दे हें सारं दैन्य इथंच—

( शिवा आणि गोपाळ येतात )

**शिवा :** ( जिवाला कवटाळून ) कुठं चाललास जिवा ?

**जिवा :** वाट फुटेल तिकडे!

**शिवा :** मला क्षमा कर जिवा. घोर अपराध झालाय माझ्या हातून. आतां विसरून जा सारं कांहीं-( गहिंवरून जिवाला कडकडून मिठी मारून ) तुझ्या पायींचं खेटर आहे मी जिवा-देवापेक्षां मोठा देव तूं-कुठली दुर्बुद्धी झाली झाली मला!-अगदीं सारं सारं विसरून जा आतां. घेऊं दे हें घर रुप्याला! तें घर आहे ( त्याच्या तोंडावर हात ठेवून ) मी नाहीं ऐकून घेणार! तुझंच आहे तें घर-त्या तुझ्या घरांत राहूं आपण सारींजणं—दारिद्र्यांतसुद्धां आनंदात राहूं आपण सारे. आँतां स्वच्छ डोळे उघडले माझे—

**जिवा :** ( मिठी सोडवून त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ) जातांना केवढा आनंदाचा ठेवा दिलास मला शिवा!—मोठे आभार झाले तुझे!—एकदां ओकलेलं पुन्हा गिळीत नसतो हा जिवा लोहार! काळजी घे या मायलेकींची. चल मोती!

**रेणुका** : दादा !—

**जिवा** : आतां तें होणं नाहीं रेणू ! हीं अशींच ओसाड पडताहेत आमचीं गावं ! हे गांवकी आणि देवस्कीचे बळी गुरवाच्या बोलापायीं जोंवर असेच खर्ची पडताहेत, तोंवर असंच होत रहायचं. शहरं भरताहेत अन् गांवं ओस पडताहेत तीं या गांवकीच्या पायीं–या देवस्कीच्या पायीं. त्या ओसाड सिंधूंतला एक बिंदू आहे मी. त्या अशा कोटीशः बिंदूंचा लोंढा बनून जातोय शहराकडे अन् त्यावरच उभारलीं जाताहेत शहरांचीं शिखरं ! पण इथं पायाचे दगड असे खचताहेत हें कुठं कुणाला दिसतंय ? हे असंच चालायचं ! आज मी जातोंय, उद्यां तुलाही यावं लागेल. शिवा, हा गोपाळ देखील येईल अन् कुणी सांगावं, या रुप्याला अन् पाटलालासुद्धां वाट धरावी लागेल मुंबईची !—आज मी जातोंय—सारे आशीर्वाद द्या मला !—पुढंसुद्धां कष्टाचे डोंगरच दिसताहेत माझ्या नजरेसमोर, त्यांना तोंड द्यायचं सामर्थ्य येईल एवढाच आशीर्वाद द्या मला. येतों शिवा—येतों रेणू—अन् तूं गोपाळ ! ( गोपाळला मिठी मारून ) तुझी नजर राहूं दे या सगळ्यांवर !

**गोपाळ** : चाललास जिवा ! जाऊं नकोस असं कुठल्या तोंडानं म्हणूं ? रागावूं नकोस—एकच शब्द विचारतों—जायला निघाला आहेस—कसा जाणार आहेस ? ( नोटांचें लहानसें पुडकें त्याच्या खिशांत कोंबून ) कर्ज म्हणून घे—नाहीं म्हणूं नकोस—माझी शपथ आहे !

**शिवा** : कोणत्या शब्दांनीं उपकार मानूं तुझे गोपाळा ? माणसाच्या संकटाला धावून येतो तो माणूस—कळलं ? देव नव्हे. या देवधर्माच्या पायीं तुम्हीं माझा छळ केला—माझा राग नाहीं तुमच्यावर–रक्तांतच भिनून गेलीय ती समजूत, तिथं तुम्हीं काय कराल ? झालं तेवढं पुरे झालं ! आतां यापुढं तरी डोळे उघडून पहा ! देवाचं नांव घेऊन माणसाचा छळ करूं नका ! मायेच्या नजरेनं सारे एकमेकांना पाहूं लागाल तर मुंबई होईल या आमच्या खेडेगांवांची ! पुन्हा एकदां सांगतों–माणूस हाच खरा देव ! प्रत्यक्ष सेवा घेतो तो ! सेवा करायची वर त्याची करा ! येतों मी. ( भट्टीजवळ जाऊन तिथली राख मस्तकाला लावतो ) हा माझ्या मायेचा अंगारा—( भडभडून येऊन, जमीनीवर हात फिरवीत ) आई ! आई !

केंव्हां भेट देणार आहेस तूं पुन्हां ! केंव्हां बोलावणार आहेस मला ? ( जमिनी-वर डोकें टेकून वर उठून डोळे पुसतो आणि राख गांठीला बांधून घेऊन नाजुक हसूं लागतो ) मिळाला निरोप ! आतां चल मोती !

**शिवा** : थांब जिवा—( मंदेचा हात धरून मोतीच्या हातीं देत ) ही घेऊन जा आपली सून बरोबर. आपल्या सासऱ्याची काळजी घे बाळ !

[ मंदा गहिंवरून आईला मिठी मारते. रेणुका तिला मोतीच्या हाती देते. जिवा, मोती आणि मंदा एकदम निघून जातात. आंतून मोती आणि मंदा ' हरपलें श्रेय ' म्हणताहेत. तें ऐकत पहिल्यानें रेणुका नंतर शिवा, नंतर गोपाळ बाहेर जातात. रुपा आणि पाटील स्तब्ध उभे आहेत. ]

[ पडदा. ]